**जय जय रघुवीरसमर्थ**) Jay Jay Raghuveer Samarth)

समर्थ श्री रामदास स्वामी चरित्र


लेखक : **अविनाश महादेव नगरकर**

nagarkaram@yahoo.com

12 kilbaaha Close,

Dannimora

Auckland 2013, Australia

फोन नंबर .00649 2715555



प्रकाशक :**ई साहित्य प्रतिष्ठान**

www.esahity.com

esahity@gmail.com

प्रकाशन :२१ डिसेंबर २०१५ (गीता जयंती)

## ||श्रीगुरु:शरणं||

संपूर्ण जगदेव नंदनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमा: गाङ्गंवारि
समस्तवारिनिवहा: पुण्या समस्ता:क्रिया: |
वाच: संस्कृतप्राकृत: श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी
सर्वावास्थितिरस्य वस्तूविषया दृष्टे परब्रह्मणि ||



हे परब्रह्मरुपी सद्गुरो, आपल्यासाठी संपूर्ण विश्व म्हणजे एक नंदनवनच आहे. सर्व वृक्ष आपणास कल्पवृक्षच आहेत. सर्व जलाशय गंगा आहेत व आपल्या सर्व क्रिया अत्यंत पवित्र आहेत. आपली वाणी संस्कृत असो कीं प्राकृत ती मला वेदासम शिरोधार्य आहे. सर्व भूमी आपल्यासाठी वाराणसीच आहे. कारण आपण सदैव ब्रह्मभावात असता.

**अनंत कोटी ब्रह्मांडनायक भगवान योगीराज सद्गुरू वामनरावजी गुळवणी महाराजांचे वर्णन श्रीमद् आद्य शंकराचार्यांच्या या सुयोग्य शब्दांखेरीज करताच येत नाही. त्यांनी घडवलेली हि कलाकृती त्यांच्याच चरणी सादर समर्पण .**

||श्रीगुरु:शरणं||

|| जय जय रघुवीर समर्थ ||

## लेखकाचे मनोगत

सर्व लिखाण साधार नाही पण निराधारही नाही. अपरिहार्यतेने काही काल्पनिक पण आहे. काही ऐकीव आहे. श्रवणभक्ती द्वारे जें श्रवण केले त्यातील सार घेतले आहे. वाचून जें  जसे समजले तसे मांडले आहे. बरे वाईट खरे खोटे जाणत्यांनी समसमा करून घ्यावे व क्षमा करावी ती न्यूनतेसाठी.

जनता जनार्दन हे दुर्वांकुर अव्हेरणार नाही याची खात्री आहे. माऊलीच्याच शब्दात सांगायचे तर,

परी गीता ईश्वर भोळा | ले व्यासोक्तिकुसुममाला |

तरी माझिया दुर्वादला | ना न म्हणे कीं || ज्ञानेश्वरी १८-१७११ ||

गुरुदेवाङ्कित अविनाश महादेव नगरकर

||श्रीगुरू:शरणं||

|| जय जय रघुवीर समर्थ ||

**१.**

**त्याकाळी** सुजलांसुफलां व रम्य वनश्रीने नटलेल्या भारतभूमीत सुरेख टुमदार गावे वसलेली असायची. त्या टुमदार गावांच्या परीसरा बाहेर वैदिक परंपरेचे आश्रम थाटलेले असत. नागरी जीवनाची समृध्द संकल्पना नि:संदिग्ध शब्दातून "ॐ सहनाववतु | सहनौभुनक्तु | सहवीर्यं करवावहै | तेजस्विनावधीतमस्तु | माविद्विषावहै | ॐशांति: शांति: शांति: |" या प्रार्थनेतून घरा घरात नांदत होती. गोदावरीच्या दक्षिणोत्तर पसरलेल्या दंडकारण्याची महती काय वर्णन करावी? अत्यंत निबिड अरण्य. वेगवेगळ्या अनेक वनस्पती होत्या. औषधींची रेलचल होती. अन्न-धान्याचा तुटवडा कुठेच नव्हता. ही सर्व गोदावरीची किमया होती. अशा या दंडकारण्याच्या आश्रयाने महाराष्ट्र प्रदेश त्याकाळी अत्यंत वैभवात व सौख्यात नांदत होता. त्याला परचक्राचे भय वाटत नव्हते. देवगिरीवर असलेल्या महादेवराय यादवाने आपला प्रचंड दरारा दक्षिणेत बसवला होता. तो दक्षिणेतला सम्राट म्हणून ख्यातनाम पावला होता.

त्यावेळी उतर भारतात सुलतानशाहीला उत आलेला होता. भारतीय संस्कृती व वैदिक परंपरा भुईसपाट करण्यात ते धन्यता मानीत होते. उत्तरेत सर्वत्र सुलतानशाहीच्या पाशवी अत्याचारांचा वरवंटा फिरत होता. विंध्याचलाच्या दक्षिणेला नर्मदा धुवाधार वाहात होती. तिचे चंदेरी पाणी जणू वाहती चांदीच वाटत होती. अथांग पाणी असलेली नर्मदा ओलांडली कीं

सातपुड्याचा पर्वत दिमाखाने उभा होता. त्या पर्वतराजी नंतर गोदावरी आणि गोदावरीच्या कुशीत विसावलेले व वृक्षराजीने बहरलेले दंडकारण्य. त्यामुळे महादेवराय यादव अगदी निश्चिंत असे. महादेवराय अत्यंत पराक्रमी होता. वृत्तीने दिलदार होता. मनाने थोर होता. स्वभावाने न्यायी होता. दीन-दुबळ्यांचे रक्षण करणे व शरणागतास अभय देणे हे त्याच्या दिलदार वृत्तीचे द्योतक होते. अशी परंपरा देवगिरीच्या यादवांना लाभली होती.

बाराव्या शतकातील ही स्थिती होती. त्याकाळी वैभवी सुबत्ता व शांतता नांदत होती. जागोजागी देखणी व वैभवशाली मंदिरे होती. त्यात प्राणप्रतिष्ठा केलेल्या देव-देवता षोडशोपचारे त्रिकाळ पूजल्या जाऊन वातावरण पवित्र होत असे. निस्पृह व आचारशुध्द याज्ञिकांच्या वेदघोषात पहाट होत असे. मंजुळ सनयांच्या आवाजात नागरिक जागे होत असत. राजा शूर पराक्रमी, धर्मज्ञ व न्यायी असला कीं भूतलावर असेच स्वर्गीय वातावरण निर्माण होणार. अशा न्यायी राजांच्या परंपरेत अनेक वर्षे गेली. अगस्ती मुनींचा शिष्य म्हणवून घेणारा विंध्याचल पर्वत शांत समाधि लाऊन बसला. आपल्या परिसरात काय घडते आहे हे तो पहायला तयार नव्हता.

देवगिरीवर त्यावेळी रामदेवराव यादवांचे प्रभुत्व होते. अफाट ऐश्वर्य होते. महाराष्ट्रभूमी त्यांच्याच अधिपत्याखाली होती. विंध्याचल पर्वत, नर्मदा नदी मग सातपुडा पर्वत इतके पार करून कोण येतय? आणि आलाच तर पाहून घेऊ. अशा घमेंडीत राजा होता. दिल्लीच्या सुलतानशाहीचा माज त्याला ज्ञात नव्हता. सुलतानशाहीचा माज सारी लाज कोळून प्याला होता. सुलतानशाही म्हणजे पाशवी अत्याचार व अनाचार! सुलतानशाही जवळ कोणतीच सहिष्णुता नव्हती. होता फक्त सत्तेचा माज. अफगाणी पठाणांच्या भादरून तुळतुळीत केलेल्या मस्तकात होता फक्त निर्लज्ज उपभोग. तिथे

न्याय नीति, सहिष्णुता इत्यादींचा पूर्ण अभाव होता. त्या अफगाणी पठाणांच्या भेसूर कंठातून कर्ण कर्कश्य “अल्लाहू अकबर “ अशी आरोळी ऐकली कीं जमिनीवरची माती सुद्धा थरकून उठायची. कारण त्या मातीला संवय होती ती फक्त मधुर वेदघोषांची, संतवाणीची आणि मंजूळ लोकगीतांची. केवळ ह्या मुलायम वाणीमुळेच ती हळुवार झाली होती. आणि सुजलां सुफलां होऊन अठराभार वनस्पती देऊन समृध्द झाली होती.

अरबी घोड्यांच्या टापांची मस्तवाल भरड तिला मानवली नाही. महाराष्ट्रभूमी जखमी झाली. घनघोर युध्द झाले. अल्लाउदीन खिलजीने विंध्याचल, नर्मदा, सातपुडा या सर्वांना पार करून धुमाकूळ घातला. ऐश्वर्यसंपन्न देवगिरी हे त्याचे लक्ष होते. सातपुडा ओलांडून दंडकारण्य तुडवीत त्याने देवगिरीवर प्रहार केला. अफगाणी अरबांच्या मनात या माती बद्दल काय भावना होती? फक्त निर्लज्ज उपभोगाची. त्यांच्या पंजाची नखे हिंस्त्रश्वापदासारखी मराठमोळ्या कन्यकांवर पडत होती. मराठी माणूस त्यांना गुलाम वाटू लागला. त्यांच्या कुलीनस्त्रिया-मुली त्यांना उपभोगाची साधने वाटू लागली. शहाळे प्यावे आणि नरोटी फेकून द्यावी तसे पाशवी अत्याचार, बलात्कार करून ते पठाणी सरदार धुमाकूळ घालीत. मराठ्यांना वेठीला धरीत. आपसात कोंबडे झुंजवावेत तसे देशमुख वतनदार यांच्यात पिढ्यानपिढ्या चालणारे वैर उत्पन्न करून देत. त्यामुळे हळू हळू सर्व महाराष्ट्रभर निरनिराळ्या शाही सुरु झाल्या. बिदरला बिरादशाही, वऱ्हाडात इमादशाही, अहमदनगरला निजामशाही, विजापूरला आदिलशाही, खानदेशात फरुकीशाही अशा शाही दरबारांचा नंगानाच सुरु झाला. धर्माचे राज्य लोप पावले आणि अधर्माचे राज्य फोफावले.

अशीच निजामशाही होती. ह्या निजामशाहीच्या वरवंट्याखाली अहमदनगरला मौजे अंबड पर्यंतचा इलाखा भरडला जात होता. नावाला सुध्दा कुठे स्वाभिमान उरू द्यायचा नाही असा जणू त्यांनी चंगच बांधला होता. देशमुख, देशपांडे, कुलकर्णी इत्यादींना वेठीस धरायचे. प्रथम त्यांना चांगली अभिलाषा उत्पन्न होईल असे वतन द्यायचे. मोगलांच्या सेवेत, शाहीसेवेत रुजू करून घ्यायचे. आणि त्यांना उपभोगाची चटक लागली कीं मग छळायला प्रारंभ करायचा.

शके १६२६ चा सुमार हता. जांबवती नगरात एक स्वाभिमानी आचारसंपन्न विप्र कठोर अनुष्ठान करीत होता. प्रभूरामचंद्रांचा तो एकनिष्ठ व निष्काम भक्त होता. कुलपरंपरेने ही सेवा त्याच्याकडे आलेली होती. प्रभूरामचंद्र हे त्यांचे गेल्या २३ पिढ्यांचे कुलदैवत होते. ठोसरांच्या कुळात जन्मास आलेले ते रत्न होते सूर्याजीपंत! सूर्याजीपंतांची अविचल निष्ठा प्रभूरामचंद्रांवर होती. त्यांचे अनुष्ठानाचे नियम शास्त्रानुसार असत. शुचिर्भूतता पाळण्यासाठी ते अनुष्ठान काळात घराबाहेर जात नसत. अतत्त्वार्थी भाषण करीत नसत. इतकेच काय पण कुणाकडे ते पहातही नसत. पण नेमकी त्याचवेळी निजामाची लहर फिरली. त्याने पठाण रवाना केले. पठाण जांबवतीस घोडे उडवीत येताना मनसोक्त पिके तुडवीत, मस्तवाल माज दाखवीत जांबवतीस दाखल झाले. वतनदार ठोसरांच्या थोरल्यावाड्यापुढे जरासुद्धा न थबकता घोड्यासह अंगणात येऊन छाती पुढे काढून थांबले. त्या घोड्यांचा माज सुद्धा पठाणांच्या तोडीसतोड होता. रिवाजाप्रमाणे स्वागत करावयाला पंत आले नाहीत. आलेल्या कुळवाडी लोकांवर लाथा झाडून त्या पठाणांनी “ सुर्याजीको बुलावा है |” म्हणून उध्दट आवाजत निजामाचा निरोप दिला. नाही म्हटले तरी सूर्याजीपंतांचा बराच दबदबा होता म्हणून पठाण

फारशी गडबड करीत नव्हते. पण सूर्याजीपंत बाहेर येणे आवश्यक होते. पठाणांनी निरोप सांगताक्षणीच सूर्याजीपंत मनोमन समजले आता काही खरे नाही. आपण निजामाच्या सेवेत राहावे अशी श्रीरामाची इच्छा दिसत नाही. प्रभूरामचंद्रांची मर्जी! त्यांनी मनोमन ठरवले कीं हे निजामाचे वतन सोडायचे. पण भोग सुटणार नव्हता. पठाणांनी निजामाची आज्ञा त्यांना सांगितली. सूर्याजीपंतांनी नकार कळवताच त्या पठाणांनी धुमाकूळ घालायला सुरुवात केली. सूर्याजीपंतांना चक्क मुसक्या बांधून घेऊन गेले. निजामाने त्यांना अपमानास्पद दंड भरायला लावला आणि मगच सोडले. पंतांनी तत्क्षणी वतनावर पाणी सोडले. निजामाच्या सेवेतून मुक्त झाले. श्रीरामाच्या चरणी मस्तक ठेऊन म्हणाले, “ आता फक्त तुझी सेवा! तूंच माझा तारक! ” आणि लेखणी श्रीरामचरणी अर्पण करून उग्र तपश्चर्या करू लागले. आधीच शास्त्रशुध्द आचार. त्यांतून आतां वतनदारीच्या द्रव्याचा त्याग केल्याने द्रव्यशुद्धी झालेली. त्यागानंतर मिळणारी स्वस्थता त्यांना सुखवीत होती. प्रेरणा देत होती.

सूर्याजीपंत उपासनेत दंग असताना त्यांनी एक चमत्कार अनुभवला. अनुष्ठानात असताना त्यांची तंद्री लागली. श्वासोच्छवास मंद झाला. नेत्र मिटलेले होते. शरीर तटस्थ झालेले होते. एकाएकी त्यांना शरीरातून बाहेर पडल्याचा अनुभव आला. कोणत्या तरी अज्ञात शक्तीने त्यांना क्षणात एका दिव्यलोकी आणले. त्यांनी त्या दिव्यलोकीच्या दरबारात प्रवेश केला. दरबारात भगवान श्रीकृष्ण बसलेले होते. इतर अनेक ऋषीमुनी बसलेले होते. त्यांच्या समक्ष भगवान श्रीकृष्णांनी श्रीहनुमंतांना अवतार संकल्पना सांगितली. हनुमंता अरे ह्याच सूर्याजीपंतांच्या पोटी तुला जन्म घ्यायचा आहे. तुला एकटे वाटायला नको म्हणून तुझ्या आधी प्रत्यक्ष सूर्यनारायणाच्या

अंशाने त्यांना एक पुत्र होईल आणि मग तूं जन्म घे! लोकांना भक्तिमार्ग दाखवण्याचे कार्य पूर्ण कर! अरे मी स्वत: ज्ञानेश्वर म्हणून जन्म घेतलाच होता नां! त्यानंतर एकनाथाच्या रूपानेही अवतारकार्य केले आहे. आता तूं ते अपुरे राहिलेले कार्य पुरे कर. हनुमंताने आपला आशीर्वादाचा हात सूर्याजीपंतांच्या मस्तकावर ठेवला. भगवान श्रीकृष्ण प्रसन्नतेने हसले. सूर्याजीपंतांना त्यावेळी वाटले कीं मी श्रीसूर्यनारायण व त्याच्या वंशातल्या प्रभूरामचंद्र यांची सेवा केली. त्यांच्या खेरीज आपल्या मनात अन्य दैवत नाही. मग आपल्याला त्यांनी दर्शन देण्या ऐवजी भगवान श्रीकृष्णांनी कसे काय दर्शन दिले? क्षणकाल हा विकल्प सूर्याजीपंतांच्या मनात उत्पन्न झाला. तत्क्षणी भगवान श्रीकृष्णांच्या डाव्या बाजूला रुक्मिणी, उजव्या बाजूला बलराम, हनुमंत त्यांच्या समोर वीरासनात बसलेले दिसले व श्रीकृष्णाच्या जागी श्रीराम, रुक्मिणीच्या जागी सीतामाई व बलरामांच्या जागी लक्ष्मण दिसू लागले. सूर्याजीपंतांना रामरक्षेतला श्लोक आठवला " दक्षिणे लक्ष्मणे यस्य वामेतु जनकात्मजा पुरतो मारुतिर्यस्य तं वंदे रघुनंदनम् |" त्यांनी थरथरत साष्टांग नमस्कार घातला. आणि डोळे भरभरून ते ध्यान पाहू लागले आणि त्यांना भगवद्गीतेतला श्लोक आठवला " इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् | विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ||" "अर्जुना अरे हाच योग मी सूर्याला शिकविला. विवस्वानाने म्हणजेच सूर्याने तो मनुला सांगितला, व मनुने इक्ष्वाकुला सांगितला. अशा परंपरेने हा योग इक्ष्वाकू वंशातल्या श्रीरामचंद्रांना प्राप्त झाला. म्हणजे तेच हे प्रभूरामचंद्र. आणि हेच ते भगवान श्रीकृष्ण! अहाहा! धन्य झालो मी! काय माझे भाग्य, अंत:करणात विकल्प उत्पन्न होताच भगवंतांनी केवढे दिव्य दर्शन दिले.माझा संदेहच नाहीसा झाला. हरिहरात भेद नाही तसा तो रामकृष्णात पण नाही. पण तर्कदुष्ट बुद्धीला हे पटावे कसे? देवा

आम्ही विकल्पमय, विषम म्हणून प्रभो आपली समता, आपले सर्वव्यापकत्व, आपले आत्मतत्त्व, आम्हाला ज्ञात होत नाही. प्रभो मी आपणास शरण आहे! ” असे म्हणून सूर्याजीपंतांनी साष्टांग नमस्कार घातला. त्याचक्षणी ते परत पुनश्च आपल्या शरीरात प्रवेशले. त्यांना श्वासोच्छ्वास जोरजोरात होऊ लागला. इतका कीं त्या आवाजाने राणूबाई थेट स्वयंपाक घरातून तिथे आल्या.

त्यांनी आपल्या पतीची अवस्था पहिली. राणूबाई आश्चर्याने थक्क झाल्या. कारण सूर्याजीपंत खूपच तेजस्वी दिसत होते. थोड्याच वेळात सूर्याजीपंत शांत झाले. त्यांनी डोळे उघडले. त्यांचे डोळे अनामिक समाधानाने, शांततेने जडावले होते.

पत्नी राणूबाई सूर्याजीपंतांशी समरस झालेल्या होत्या. महापतिव्रता अशा या साध्वी स्त्रीला एक दिवस डोहाळे लागले. मुखावर तेज चमकू लागले. भगवन्नामस्मरण अंत:करणात तीव्रता धरण करू लागले. आणि शके १५२७ मध्ये राणूबाई प्रसूत झाल्या. एका तेजस्वी व विलोभनीय अपत्याला त्यांनी जन्म दिला. त्याचे नाव गंगाधर ठेवले. दिसामासाने गंगाधर वाढू लागला. त्या आनंदात कालक्रमणा होत होती. दोन वर्षाच्या अवधी नंतर राणूबाईंना पुन्हा दिवस गेले. त्यांना अंगात वीरश्री संचारल्या सारखे होई. त्यांच्या भुजा स्फुरण पावत. वारंवार नामस्मरणाचे कढ येत. त्या बसल्याजागी एकटक नजर लावून अंतरातल्या हुंकारात दंग व्हायच्या. सूर्याजीपंतांना काळजी वाटायची पण राणूबाईंच्या निर्दोष हालचाली व अचूक वागणे पाहून भगवंताचे अधिष्ठान निर्माण झाल्याच्या जाणीवेतून ते निश्चिंत व्हायचे. त्यांचा आत्मविश्वास वाढायचा. महाराष्ट्रात ईश्वरनिष्ठांची मांदियाळी निर्माण होत होती.

महराष्ट्रात चैतन्याचे वारे वाहू लागले. शके १५३० मधल्या चैत्र महिन्यात शुक्ल पक्षातल्या रामनवमीला माध्यान्ही राणूबाईंनी एका तेजस्वी

अपत्याला जन्म दिला. सूर्याजीपंतांनी जाम्बवती नगरीत साखर वाटली. बालक गोरेपान व प्रभातकालच्या उगवत्या सुर्यासाखे तेज:पुंज होते. राणूबाई त्या बालकास पाहून हरखून गेल्या. त्यांच्या स्तनातून बत्तीसधारा क्षीर वाहू लागले. त्या माउलीला आपला प्रेमपान्हा आवरता आला नाही. ते बालक त्या प्रेमामृतात न्हाहून निघाले, समर्थ झाले.

सूर्याजीपंतांना जातकर्म करण्यासाठी पाचारण करण्यात आले. पुण्याहवाचन सुरु होते. वातावरण हर्षोल्हासाने भरले होते. लहानगा गंगाधर आनंदाने दुडूदुडू धावत होता. कोणत्या तरी अनामिक संवेदना त्याला भारावून टाकीत होत्या. सूर्याजीपंत हातात जातकर्म करण्याची सामग्री घेऊन बाळबाळंतीणीच्या खोलीत आले. खोलीत प्रवेश करून त्यांनी जेंव्हा बालक पाहिले तेंव्हा ते मंत्रमुग्ध होऊन गेले. पण त्याही पेक्षा विशेष गोष्ट त्यांनी पाहिली कीं जी इतरांना दिसत नव्हती. सूर्याजीपंतांनी पाहिले, श्रीएकनाथ महाराज खोलीत आले आहेत. नुकत्याच जन्मलेल्या बालकाच्या मस्तकावर त्यांनी आपला वरदहस्त ठेवला आहे. सूर्याजीपंत आश्चर्यचकित झाले. हातीची सामग्री खाली ठेवली. नाथ महाराजांना साष्टांग नमस्कार केला.

श्रीनाथमहाराज प्रसन्नतेने हसले. त्यांनी प्रकट वाणीने सांगितले. हा आमचे राहिलेले कार्य पूर्ण करील. ज्ञानेश्वर महाराजांची पण तशीच इच्छा आहे. महाराष्ट्र नगरीच्या नागरिकांना " अमृतातेही पैजेसी जिंके ऐसी अक्षरे" रसिकतेने मिळवून देणाऱ्या संतांचे हे सत्यसंकल्प होते. महाराष्ट्र सर्वार्थाने सनाथ होणार होता. सूर्याजीपंतांना धन्य वाटत होते. जीवनाचे सार्थक झाल्या सारखे वाटत होते. जातकर्म करून त्या मोहक बालकाला मधाचे बोट चाटवून ते बाहेर आले. बाहेर गावातील प्रसिध्द ज्योतिषी आले होते. त्यांनी बालकाची कुंडली मांडली होती. अत्यंत प्रसन्न होऊन त्यांनी सूर्याजीपंतांचे

मन:पूर्वक अभिनंदन केले. ही बातमी जिकडे तिकडे पसरत होती. जांबवती नगरीच्या गोदातीरी असलेल्या श्रीराम मंदिरात चालेल्या श्रीराम जन्मोत्सवाच्या आनंदाला नुसते उधाण आले होते. प्रत्येकाला जणू अंत:स्फूर्तीने नामस्मरणाचा उमाळा येत होता. श्रीरामचंद्रांच्या नामस्मरणाने मंदिराचा आसमंत दणाणून गेला होता. झांजा, मृदुंग, तबला, झल्लरी, टाळ, घोळ, भक्त भावार्थाने गाऊ लागले, गाता गाता नाचू लागले, नामस्मरणात तल्लीन झाले.

सूर्याजीपंतांनी अपत्यांचे नाव 'नारायण' असे ठेवले. नारायण शुक्ल पक्षातल्या चंद्रासारखा वाढू लागला. घरभर दंगा करू लागला. त्याच्या खोड्यांनी आणि बागडण्याने राणूबाईंना वाडा लहान वाटू लागला. राणूबाईंचा भाऊ भानाजी वारंवार नारायणाला पाहण्यासाठी येत असे. नारायणालाही ह्या मामाचे वेड लागले. भानाजीमामा कीर्तनकार होते. फार सुंदर कीर्तन करीत असत. गावोगावी कीर्तन करीत हिंडायचे. हजरजबाबी, तितकेच चाणाक्ष, जबरदस्त निरीक्षणशक्ती असलेले व्यक्तीमत्व असलेले. दर रामनवमीला जांबवतीच्या श्रीराम मंदिरात त्यांचेच कीर्तन होत असे. गंगाधर व नारायण यांच्या जन्मानंतर त्यांचे जांबवतीस येणे वाढले होते. आपल्या दोन्ही भाच्यांना पाहून ते हरखून गेले होते. त्यांच्या दृष्टीने दोन्ही भाचे द्रष्टे होणार होते. गंगाधर शांत व बुद्धिमान. नारायण बुद्धिमान, निर्भय, खोडकर पण प्रेमळ. राणूबाई भावाजवळ तक्रार करायच्या. म्हणायच्या ह्या नारायणाला बसवीत जा तुझ्या कीर्तनाला. फार खोड्या करतो. चार वर्षाचा नारायण खरेच फार खोड्या करीत असे. पण आईने आपल्या भावाजवळ तक्रार केल्या पासून नारायण वडील भावा बरोबर मामाच्या कीर्तनाला बसू लागला. तासन् तास कीर्तन ऐकू लागला. त्याला जणू भावसमाधीच लागायची. मामा भानाजीपंत

मोठे प्रभावी कीर्तनकार होते. त्यांच्या कीर्तनाला नेहेमीच गर्दी असावयाची. पण न कंटाळता नारायणा खेरीज लहान मुलांपैकी कोणीच बसत नसे. त्यामुळे भानाजीपंतांना नारायणाचे भारीच कौतुक वाटायचे. बहिणीने केलेली तक्रार खोटी वाटायची. भानाजीपंत नारायणाच्या जन्मापासून न चुकता चैत्र प्रतिपदेपासून ते रामनवमी पर्यंत जांबवतीनगरीत श्रीराममंदिरात कीर्तन करू लागले होते. त्यासाठी ते आसनगावाहून येत असत. भाच्याच्या ओढीने यावयाचे व भावपूर्ण कीर्तन करायचे.त्यांच्या कीर्तनात जणू प्रत्यक्ष श्रीरामच रंग भरायचे. भानाजीपंतांचा आवाज अतिशय गोड होता पण त्याही पेक्षा त्यांचा भाव अधिक मधुर होता. नारायण कीर्तन ऐकता ऐकता त्यात तल्लीन होत असे. कारण त्यात श्रीराम चरित्र असायचे. भक्त वत्सल प्रभुरामचंद्रांचा त्याग त्यांना मुग्ध करीत असे.

हरीभक्त भानाजीपंत कीर्तनात सांगायचे, " प्रभूरामचंद्राचे स्मरण करा. अहो ज्याच्या नुसत्या पदस्पर्शाने शीळा उद्धरली, ज्याच्या नुसत्या नाम लिहिण्याने जडशीळा सागरावर तरल्या, ज्याच्या नुसत्या नामस्मरणाने भगवान श्रीशंकरांचा हलाहलाचा दाह शांत झाला त्या प्रभू रामचंद्रांच्या नामाचा महिमा अगाध आहे. भवसागर तरण्याचा मोठा उपाय आहे. जितका मोठा तितकाच सोपा आहे." नारायण शांत चित्ताने ऐकायचा. नामस्मरण करायचा. पण मित्रांमध्ये खेळताना दंगा करायचा. आपटाधोपटी करायचा. घरी तक्रारी यायच्या. पण त्या तक्रारीत तक्रारीपेक्षा कौतुकच जास्त असायचे. कारण एकच, नारायणाने कितीही खोड्या केल्या तरी त्याच्या स्वभावात एक वैशिष्ट्य असे होते कीं ज्याच्या खोड्या करायचा त्याच्याशी लगेच अत्यंत प्रेमळ वागायचा. झालेल्या खोडीचे दु:ख त्या मुलाला वाटायचे नाही. त्या ऐवजी नारायण हवा हवासा वाटायचा. कारण नारायणाच्या खोड्यात निर्भेळ

मौज असायची द्वेष वा राग नसायचा. राणूबाई माहेरी आल्या कीं नारायणाचा सहवास मिळावा म्हणून भानाजीपंत आसनगाव सोडून कुठे जात नसत. भाच्यां बरोबर राहायचे. त्यांना रामकथा ऐकवायाचे. नारायण आपले टपोरे डोळे न मिटता एकटक पाहत राहायचा. मामा बोलत राहायचे. भाचे ऐकत बसायचे.

नारायण तल्लख बुद्धीचा. बालपणीच प्रश्न विचारायचा, " देव खरंच भेटतो काहो मामा! "

मामा "हो" म्हणयचे.

नारायण विचारी "काय करावे लागते देव भेटण्यासाठी?"

मामा सांगायचे "नामस्मरण"!

नारायण विचारी, "ते कसे करायचे?"

मामा सांगायचे "काया,वाचा मने! "

नारायण अंतर्मुख व्हायचा. मामांना कौतुक वाटायचे. नारायणाच्या अंतरात ते खोल रुजायचे. मामा-भाच्यांचे संवाद चालायचे.

नारायण विचारायचा 'देव कोठे राहतो! मामा! ' मामा सांगायचे "सर्वत्र"!

"मग मंदिरात कां जायचे?" नारायण.

"अरे घरी तशी भावना होत नाही म्हणून." मामा उत्तरायचे.

"कां होता नाही! " नारायणाचा प्रश्न.

"प्रपंचात मन गुंतते नां! मायादेवीचे इथे प्राबल्य जास्त असते."

"ही मायादेवी कोण?"

"परमेश्वराची पतिव्रता स्त्री! "

"मग तिलाच कां नाही शरण जायचे?"

"कारण ती सूक्ष्मात प्रवेश करू देत नाही."

“पण मामा देव जर सर्वत्र आहे तर मग सूक्ष्मात प्रवेश कशाला हवा?”

लहानगा नारायण अक्षरश: असे पाठो पाठ अनेक प्रश्न विचारायचा. आणि मामा न कंटाळा करता त्याचे समाधान करावयाचे. त्यांना नारायणाचे कौतुकाच वाटायचे. मनोमन त्यांना माउलीच्या ज्ञानेश्वरीतल्या ओवीची आठवण यावयाची, “वयेसचिया गांवा न येता | दशेची वाट न पाहता | बालपणीच सर्वज्ञता | वरी तयाते ||” भानाजी नारायणाला हृदयाशी कवटाळायचे आणि त्याचे मस्तक हुंगायचे. त्याला आशीर्वाद द्यायचे. राणूबाई कौतुकाने पहात राहायच्या. राणूबाई निघण्याच्या वेळी भानाजीपंत साश्रूपूर्ण नेत्रांनी निरोप द्यायचे. नारायणाला तोंडभरून आशीर्वाद द्यायचे. “समर्थ व्हा! बलवान व्हा! कीर्तिमान् व्हा! धर्मज्ञ व्हा! ” त्या आशीर्वादात आत्मीयता असायची. प्रामाणिक सद्भावना असायची. त्यात भगवंताचे अधिष्ठान असायचे. त्यांच्या दृष्टीने नारायण म्हणजे दिव्य पुरुष होणार होता. रत्नपारख्याने रत्नाची पारख केली होती.

भानाजीपंत गावोगाव कीर्तन करताना लोकांच्या मनात स्वाभिमान जागृत करीत असत. कारण त्या काळात सगळा महाराष्ट्र पोखरला जात होता. मराठे सरदार निजामाची मर्जी संपादन करण्यासाठी आपसात भांडायचे. मग निजामाने केलेल्या कौतुकाने धन्यता मानायचे. मान मरातबाच्या पाठी लागून स्वकीयांच्या पाठीत खंजीर खुपसायचे. आपसातले वैमनस्य वाढवायचे. भानाजीपंतांना याचा तीव्र राग असायचा. त्या बाबत ते प्रबोधन करावयाचे. कीर्तनाच्या माध्यमातून ज्ञानदान करावयाचे. मराठमोळा देश ते ज्ञान आपल्या पोटात साठवायचा. आचरणात आणायला बळ नसायचे. मार्ग समजायचा नाही. लोकांना सन्मार्ग दाखवावा. भूमी मोगलांच्या कचाट्यातून सोडवावी. तोच संकल्प मनात ठेवून भानाजीपंत वारंवार

जांबवतीस जात असत. भानाजीपंतांचा संकल्प व्हावयाचा. नारायण त्यासाठी समर्थ व्हावा. त्याने हा भार उचलावा. म्हणून ते नारायणाला श्रीमद्भागवतातल्या, रामायणातल्या गोष्टी सांगत असत.

त्याकाळच्या प्रथेप्रमाणे गंगाधराचा विवाह शके १५३४ म्हणजे गंगाधराच्या वयाच्या आठव्या वर्षीच झाला होता. गांगाधरांच्या समंजस व प्रौढ वागण्यामुळे लोक त्यांना श्रेष्ठ म्हणून संबोधू लागले होते. सूर्याजीपंतांनी एका सुमुहूर्तावर गांगाधरांना मंत्रोपदेश दिला. त्या उपासनेमुळे ते लहान वयातच अधिकाराने श्रेष्ठ झाले. तेच नाव लोकांनी पुढे चालवले. श्रेष्ठांचा आब वाढला.

लहानपणा पासून नारायणाच्या मनात भगवंत म्हणजे प्रभूरामचंद्र अशी ठाम धारणा झाली होती. तो श्रीरामाचेच सतत स्मरण करायचा. शिक्षणात त्याची चांगलीच प्रगती होती. नारायण एकपाठी होता. त्यामुळे रुपावली, समासचक्र, भगवद्गीता, हंसगीता, रुद्र, पवमान, पुरुषसूक्त, स्त्रीसूक्त, ब्रह्मयज्ञ इत्यादी त्याला कंठस्थ झालेले होते. एक दिवस नारायणाने वडिलांजवळ हट्ट धरला. मलापण श्रेष्ठांसारखा मंत्रोपादेश द्या! सूर्याजीपंत मनोमन जरी सुखावले तरी नारायणाचा हूड स्वभाव पाहून गप्प बसले. मनात विचार केला अजून जरा शांत होऊ दे. मग पाहू. वडील लक्ष देत नाहीत म्हणून नारायणाने श्रेष्ठांना विनवून पहिले. पण भाऊ भावास उपदेश देऊ शकत नाही असे सांगून श्रेष्ठांनी वेळ मारून नेली. नारायण हिरमुसला झाला. त्याच्या नेत्रात पाणी तरळले. त्याला मंदिरातल्या पुजाऱ्याकडून असे कळले होते कीं मंत्रोपदेश झाल्या खेरीज श्रीराम भेटत नाहीत. मंत्रोपदेश झाल्या खेरीज श्रीराम कसे भेटणार? ह्या विवंचनेमुळे नारायणाला चक्क रडू कोसळले. श्रीरामांच्या भेटीसाठी आतुर झालेला तो लहानगा जीव तळमळून रडू

लागला. त्याला रडू आवरेना. अश्रुपूर्ण नेत्रांनी तो हळूच घराबाहेर पडला. गावाबाहेरच्या अरण्यात आला. त्याची तंद्री लागली होती ती श्रीराम भेटीची. पावले चालत होती पण वाट ठाऊक नव्हती. त्याची नजर शून्यात लागली होती. त्याला सारे विश्व एकाकी वाटू लागले. चालता चालता तो नकळत एका शिलेवर बसला. वर आकाश खाली पृथ्वी. त्याच्या सगळ्या संवेदना बधीर झाल्या. त्याच्या नेत्रांसमोर आता काहीच नव्हते. उन्हाचा त्रास नव्हता कीं वायूची शीतलता नव्हती. अंतरात एकाच जाणीव होती आणि ती म्हणजे "तुजवीण रामा मज कंठवेना."

नारायण कोठे गेला? घरी शोधा-शोध सुरु झाली. श्रेष्ठांना सांगता येईना. सूर्याजीपंतांना माहित नव्हते. गावकऱ्यांना माहित नव्हते. संध्याकाळ होत आली. रानात गेलेली गुरे परतत होती. गायी वासरांच्या ओढीने तट्ट झालेल्या कासेने अवघडून पण झपाझप चालत होत्या. त्यांच्या गळ्यातल्या घंटांचा मंजुळ ध्वनी सर्वत्र निनादत होता. पण गावकऱ्यांचे अंतर एका वासरासाठी हुरावले होते. सूर्याजीपंत आतुरतेने गावाबाहेर शोध घेण्यास निघाले. त्यावेळी एका गुरख्या बरोबर येत असलेल्या नारायणाला पाहून त्यांना एकदम हायसे वाटले. रानातून गायी चारून येताना त्या गुराख्याने नारायणास एका शिळेवर ध्यानस्थ बसलेले पाहिले. त्याला उठवून घेऊन आला. घरी येतांच राणूबाईंनी नारायणाची दृष्ट काढली. सूर्याजीपंत, श्रेष्ठ व गावकरी नारायणास अधिक जपू लागले. पण दिवसेंदिवस नारायण स्वत:लाच हरवून बसू लागला. हळू हळू अबोल व्हायला लागला. आई विचारायची 'नारायणा उदास कारे झालास?' नारायण सांगायचा 'आई! काही कळत नाही गं! पण .....काळजी मात्र वाटते.' आई म्हणली, 'अरे एवढासा तूं! तुला रे कशाची काळजी वाटते?' नारायण शांतपणे म्हणाला "विश्वाची! "

नारायण व राणूबाई यांचा हा संवाद सूर्याजीपंतांना अस्वस्थ करायचा. त्यांनी एकदा भानाजीपंत आल्यावर नारायणाचा हा विषय काढला. सर्व ऐकून भानाजीपंतांना आश्चर्य वाटले. त्यांना नारायणाची लक्षणे म्हणजे तीव्र विरक्तीची खोल रुजलेली जाणीव वाटली. पण ते काही बोलले नाही! त्यांनी आपल्या बहिणीला व मेव्हण्याला धीरच दिला. भानाजीपंत काही काळ तिथेच राहिले. लहानग्या नारायणाचा व्रतबंध झाला. गायत्रीचा प्रबोध झाला. सूर्याजीपंतांकडून नारायणात मंत्र संक्रमण झाले. नारायण आता त्रिकाळ संध्या नियमाने करू लागला. गायत्रीमंत्र मन:पूर्वक जपू लागला. मामांच्या कीर्तनात त्याने त्याने ऐकले होते, "शास्त्र म्हणेल जें सांडावे | ते राज्यही तृण मानावे | जें घेववी ते न म्हणावे | विषही विरू ||" आचार संपन्न कुळात उत्पन्न झालेल्या नारायणास इतका उपदेश पुरेसा होता. नारायणाच्या मनात अनेक प्रश्न उत्पन्न व्हावयाचे. मग मामा आले कीं त्यांचे हितगुज चालायचे.

नारायण विचारायचा, " मामा! शेषाने आपल्या मस्तकावर पृथ्वी धारण केली आहे हे खरे आहे नां?"

"हो! "

"मग तो दिसत कसा नाही?"

"कारण तो वायू रुपात आहे! "

" मग तो वायू स्वतंत्र नाही कां?"

"आहे! "

"मग तो कोणाचे स्वरूप आहे?"

"गुणाचे! "

"गुणाचे स्वरूप म्हणजे काय?"

"प्रकृतीचे .. मायेचे! "

“मग ईश्वर कोठे राहतो?”

“मायच्या पलीकडे! ”

“पण मामा तुम्ही तर नेहेमी सांगता कीं ईश्वर सर्वव्यापी आहे म्हणून! मग माये पलीकडे कसा?”

“हो रे! मायेत तर आहेच पण तो सर्वव्यापी असल्यामुळे मायेत असूनही माये नंतरही उरतो. जो उरतो तो ही अनंत असतो. म्हणूनच तो ईश्वर असतो. आपण मायेच्या पलीकडे जात नाही म्हणून तो आपल्याला भेटत नाही. ”

“मग मायेच्या पलीकडे कसें जायचे?”

“सर्वसंग परित्याग करून! ”

“सर्वात जास्त माया कशात असते?”

“स्त्रीत! ”

नारायण मुग्ध झाला. नारायणच्या प्रश्नांना उत्तरे देता देता मामा स्वत:च स्वत:ला हरवून बसले. आपण कोणाला उत्तरे देत आहोत हे त्यांच्या ध्यानात आलेच नाही. नारायण अंतर्मुख झाल्यासारखा मुग्ध झाल्यावर त्यांच्या ते लक्षात आले. पण आता वेळ निघून गेली होती. आता मामा अस्वस्थ झाले पण काहीच उपयोग नव्हता. नारायण काय समजायचे ते समजून गेला होता.

नारायणाने प्रभुरामचंद्रांना भेटण्याचा निश्चय केला. त्याने कथा पुरांणातून खूप ऐकले होते. त्याचाच प्रत्यय घ्यायचे ठरवले. तो सतत हनुमंताची प्रार्थना करीत होता. त्यावर्षी श्रावणातल्या शुद्ध अष्टमीला कसली तरी पर्वणी होती. घरातील सर्व मंडळी गोदावरीच्या स्नानासाठी गेली होती. नारायण घरीच थांबला होता. घरातल्या चौकातल्या आडाचे पाणी काढून

स्नान केले. आणि जप करण्यास बसला. जप कसला? तर हनुमंताचा! कशासाठी तर श्रीराम भेटीसाठी! अत्यंत तळमळून त्याची प्रार्थना चालली होती. नेत्रातून अश्रू वाहत होते. वाणी मुग्ध झाली होती. मनाच्या कानाकोपऱ्यातून तो हनुमंताला हांका मारीत होता. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले होते. श्वास रोखला गेला होता. प्राण कंठगत झाला होता. आणि काही विपरीत घडण्यापूर्वीच कोणी तरी माळवदावरून उडी मारून खिडकीतून आंत आले. नारायण हनुमंताचा धांवा करीत होता. त्याचे नेत्र मिटलेले होते. त्या आलेल्या बलाढ्य व्यक्तीने नारायणास चक्क उचलून घेतले. आकस्मिकतेमुळे नारायण दचकला. त्याला कळेना हे काय होते आहे. तो झटापट करू लागला. त्या भीमकाय व्यक्तीने नारायणास आपल्या बाहूंच्या विळख्यात बंदिस्त केले होते. आता नारायण गपचूप बसला. आल्या मार्गाने ती व्यक्ती नारायणास घेऊन निघाली. आणि आकाशात झेप घेऊन एका झपाट्यात ब्रह्मारण्यात आली. एका विशाल शिबिके समोर नारायणास उभा केला.

नारायणास आश्चर्य वाटले. डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच आपण इथे आलोच कसें? त्याला न राहवून त्याने त्या भीमकाय देहाच्या चेहऱ्याकडे पाहिले. साक्षात हनुमंतच समोर उभा! हनुमंताने नारायणास शिबिकेत प्रवेश करण्यास सांगितले. ती शिबिका म्हणजे चक्क राजप्रसाद होता. आतमध्ये अष्टगंधाचा सुवास पसरला होता. शीतल प्रकाश व शीतल वातावरण होते. प्रसन्न व पवित्र. नारायणाचे अष्टसात्विक भाव जागे झाले. त्याचे उर धपापू लागले. अंग रोमांचित झाले. कंठ सद्गद झाला. त्याने समोर पहिले. देदीप्यमान भगवान श्रीराम समोर उभे होते. डाव्या बाजूला सीतामाई, उजव्या बाजूला लक्ष्मण, मागे चवऱ्या ढाळणारे भरत व शत्रुघ्न! समोर वीरासनात हनुमंत!

श्रीराम पंचायतन समोर प्रकट झालेले. लहानगा नारायण पूर्ण भारावून गेला. त्याच्या सर्व संवेदना श्रीराममय झाल्या. प्रभुरामचंद्रांच्या मुखावरचे तेज कोटीसूर्यां पेक्षा जास्त असूनही शीतल होते. आणि नेत्रांना आल्हाद देत होते. सांवळी कांती तितकीच तेजस्वी होती. चहुबाजूला त्या पंचायतनाची प्रभा पसरली होती. नारायण ते दिव्य दर्शन घेत देहभान हरपून तटस्थ उभा राहिला. क्षणभराने भानावर आला. त्याने साष्टांग नमस्कार घातला. प्रभुरामचंद्रांनी त्याच्या मस्तकावरून हात फिरवला. त्याला उभा केला. त्याचा उजवा हात श्रीरामांनी हनुमंताच्या हातात दिला. म्हणाले, प्राज्ञिक हनुमंता! ह्याला सांभाळ. तूं ह्याला मंत्रोपदेश दे. त्याला लोककार्य करण्याचे सामर्थ्य दे. श्रीहनुमंताने मोठ्या प्रेमाने नारायणास आपल्या हृदयाशी कवटाळले.ज्या हृदयात श्रीरामांखेरीज काहीच नव्हते त्या हृदयाचा स्पर्श होताच आधीच राममय झालेला नारायण लगेच भावसमाधीत गेला. त्याच अवस्थेत हनुमंतांनी त्याला मंत्रोपदेश केला. त्या भावसमाधीतच तो मंत्र नारायणाच्या सर्वांगातून, रोमारोमातून प्रवाही झाला. श्रीरामचंद्र अंतर्धान पावले. हनुमंताने पुनश्च नारायणास त्याच्या घरी त्याच जागेवर आणू बसवले. नारायणाचा ब्रह्मभाव तसाच होता. त्याला कशाचेच भान नव्हते. लंगोटी लावून जपाला बसलेल्या अवस्थेतच तो शून्यात नजर लावून स्वस्थ आणि शांत बसला.

सूर्याजीपंत व इतर मंडळी पर्वकाळचे स्नान करून श्रीराम मंदिरात जाऊन श्रीराम दर्शन घेऊन घरी परत आली. आतां दुपार टळून गेली होती. उन्हे उतरतीला लागली होती. नारायणाला स्वस्थ बसलेला पाहून सर्वांनाच बरे वाटले. पण बराच वेळ झाला तरी नारायण एकाच जागी बसून होता. ते पाहून सूर्याजीपंत थोडे अस्वस्थ झाले. त्यांना आश्चर्य वाटू लागले कीं आज

नारायण इतकावेळ एकाच जागी स्वस्थ कसा काय बसला आहे? त्यांनी राणूबाईंना हीं गोष्ट सांगितली. पण त्यांनी ते फारसे मनावर घेतले नाही. पण अशी तिन्हीसांज टळली आणि दिवे लागणी झाली. देवघरातला लामणदिवा प्रज्वलित केला. तरी सुद्धा नारायण स्तब्धच. आतां मात्र राणूबाईंना रहाववले नाही. काही न खाता न पिता शांत बसून राहिलेल्या नारायणाजवळ त्या गेल्या. त्यांनी हळूच मृदू व प्रेमार्द्र स्वरात हांक मारली, “नारायणा”! त्या ओतप्रत प्रेम भरलेल्या सुध्द सात्विक आवाजातल्या नादब्रह्माने नारायणाचे अष्टसात्विक भाव लगेच जागे झाले. त्याला एकाएकी प्रभूरामचंद्रांच्या वियोगाची तीव्र जाणीव झाली. आईलाच नारायण रामचंद्र समजून बिलगला. ओक्साबोक्शी रडू लागला. त्याच्या त्या परब्रह्माच्या विरहाने होणाऱ्या रुदानामुळे घरात काही वेगळीच पण पवित्र संवेदना निर्माण झाली. सूर्याजीपंत तिथे आले. तत्क्षणी नारायणाने आपल्या पित्याच्या चरणावर मस्तक ठेवले. पित्याच्या चरणावर अश्रूंचा अभिषेक केला. नारायणाची काया थरथरत होती. इतक्यात तिथे आलेल्या श्रेष्ठांच्या चरणावर नारायणाने मस्तक ठेवले. श्रेष्ठ तसे वयाने फार काही मोठे नव्हते. तीनच वर्षांनी वडील होते. पण केवढे पोक्त वाटले नारायणास! श्रेष्ठांनी नारायणास आपल्या हृदयाशी कवटाळले. हळूच विचारले,’ काय झाले रे! ’ नारायणास शब्द स्फुरत होते पण ते मुखावाटे बाहेर पडू शकत नव्हते. त्या अवस्थेतच नारायण नव्हता. सुहृदांचा स्पर्श त्याला अधिकाधिक अंतर्मुख करीत होता. त्याच्या नेत्रात सगळ्यांना काही वेगळीच चमक जाणवली. त्यांनी नारायणास तिथेच बसवून घेतले. सूर्याजीपंत त्यांच्या आसनावर बसून राहिले. बाकीचे आपल्या उद्योगाला लागले. सूर्याजीपंतांनी नारायणास पुन्हा पुन्हा काही प्रश्न विचारले. पण मुखातून ‘श्रीराम’ ‘श्रीराम ‘ व नेत्रातून अश्रू या खेरीज नारायणाकडून काहीच प्रतिसाद नव्हता. सूर्याजीपंत

अस्वस्थ झाले. त्यांनी नारायणास अत्यंत प्रेमाने विचारले. पण त्याचा परिणाम नारायणास भगवद्भक्तीचा उमाळा येण्यातच झाला. त्याच्या कंठातून ध्वनिमय हुंकारा खेरीज काहीच येईनासे झाले. दृष्टि शून्यात लागली गेली. बुबुळे निश्चळ झाली होती. डोळ्यांच्या पापण्याही स्तब्ध झाल्या होत्या. ती रात्र त्यांनी कशीबशी काढली. दुसरे दिवशी पहाटेच प्रथम त्यांनी नारायणाची खबर घेतली.

नारायण चौकातल्या आडाचे पाणी काढून स्नान करून संध्या करायला बसल्याचे पाहून त्यांना समाधान वाटले. सूर्याजीपंत त्यांच्या उद्योगाला लागले. जो तो आपल्या उद्योगाला लागलेला. पण नारायण तसाच बसलेला. त्याचा ब्रह्मभाव उतरलाच नव्हता. तो तसाच डोळे मिटून मंत्रजपात मग्न झाला होता. त्याच्या मनात तो मंत्र आपोआप होत असल्याचे त्याला जाणवले. जापाकडे त्याचे सारे लक्ष केंद्रित झाले होते. हळू हळू त्याच्या बेंबी खाली काही हालचाल होऊ लागली. त्याची मान व पाठीचा कणा एका रेषेत आली. त्याला काही कळण्याच्या आतच नाभिखालून एक अनामिक संवेदना विजेसाखी चमकून मस्तकात गेली. काय होतेय हे त्याला समजत नव्हते. पण जें होत होते त्यामुळे तो अधिकच स्वस्थ व शांत होत होता. मंत्र जप त्याला सुखवीत होता. व तो निर्विकल्प होत होता. दृष्टि असूनही दिसत नव्हते व जें दिसत होते ते या जगातले नव्हते. खरे, खोटे असा काही विचार नव्हता आणि मनात श्रीरामाखेरीज रिता ठाव नव्हता. मनाचे मनपण मोडले होते. बुद्धीची झेप थांबून ती निश्चल झाली होती. संकल्पच नव्हता तर विकल्प कुठून असणार? अशा अवस्थेत नारायणाने अनुभवले कीं हृदयात काही तरी एकवटते आहे. श्वासोच्छवास रोधला जात आहे. क्षणातच नारायण सर्वांच्या पार झाला. अशा एका ठिकाणी तो आला कीं जिथे काहीच नव्हते.पण काहीच

नव्हते म्हणाव तर आनंदोर्मी कसल्या होत्या? नारायण फक्त साक्षी रूपाने पहात होता. त्याला भगवद्गीतेतला श्लोक आठवला, "अधिभूतं क्षरो भाव: पुरुश्चाधिदैवतम् | अधियज्ञोऽहमेमात्र देहे देहभृतांवर ||" (नाश पावणाऱ्या शरीराला अधिभूत असे म्हणतात. त्यात प्रवृत्ती रूपाने भोग घेण्याचे ज्ञान असणारा पुरुष असतो त्याला अधिदैव असे म्हणतात. देहावरील आसक्ती नाहीशी करणारा अधियज्ञ तर प्रत्यक्ष मी स्वत:च आहे.)

नारायण असा शांत बसला होता. राणूबाईंनी त्याला हांका मारल्या. पण नारायण स्तब्धच होता. त्या उठून ओसरीवर नारायणा जवळ आल्या. उन्हे वर आली होती. वेदशास्त्र पाठशाळेत जाण्याची वेळ झाली होती. त्यांनी नारायणास तशी जाणीव दिली. नारायण शांतपणे उठला. लंगोटीतच शाळेत जाण्यास निघाला. पाठशाला म्हणजे दशग्रंथी ब्राह्मणाचे घर होते. तरी काय झाले? त्या माउलीला आपल्या मुलाने लंगोटीत बाहेर पडावे हे कसे सहन व्हावे? राणूबाईंनी नारायणास आडवले. त्याचा हात धरून त्याला परत ओसरीवर आणले. त्याच्या पुढे उपरणे धोतर टाकले. नारायणाने ते अत्यंत निर्विकारपणे परिधान केले आणि पाठशाळेत निघून गेला.

माध्यान्ह काळ झाला. सूर्याजीपंत व्यवसाय आटोपून घरी आले. नित्याप्रमाणे उपस्नान करून, आचमनादी करून त्यांनी सोवळ्यात वैश्वदेव व नैवेद्य केला. अतिथीमार्ग पाहून भोजनास आले. त्यांच्या बाजूला श्रेष्ठ, श्रेष्ठांच्या पलीकडे नारायण. नारायण पानाकडे पहात बसला होता. आपोशन घेतलेच नव्हते. राणूबाईंनी सुर्याजीपंतांना खुणेने ते दाखवले. "नारायणा अरे चित्राहुती घाल. आपोशन घे." पण नारायणाचे लक्ष खाण्यापिण्यात नाही. खेळण्यात नाही. अभ्यासात नाही. सूर्याजीपंत चांगलेच धास्तावले. त्यांना काय करावे ते समजेना. त्यांनी जांबेतल्या विद्वानांचे मत घेतले. पण एकाच्या

विरुध्द दुसऱ्याचे. अशा मतमतांतरांच्या गलक्यात कोणाचे खरे आणि कोणाचे खोटे हेच त्यांना कळेना. शेवटी न राहवून त्यांनी आसनगांवला भानाजीपंतांना निरोप धाडला. भाच्यावरच्या प्रेमामुळे भानाजीपंत तत्काळ निघाले. त्यांना नारायणाचे जबरदस्त आकर्षण होते. त्यांच्या मते नारायण एक अलौकिक रत्न होते. जांबेत आल्या आल्या प्रथम त्यांनी श्रीराम मंदिरात जाऊन श्रीरामाचे दर्शन घेतले. श्रीरामांच्या दोन्ही बाजूस पुरुष उंचीच्या समयांच्या मंद प्रकाशात गर्भागारातल्या शांत व पवित्र वातावरणात ते श्रीरामाकडे एकटक पहात उभे राहिले. जणू श्रीरामांच्या हृदयाचा ठाव घेत होते. प्रभुरामचंद्र गुलाबी रंगाच्या झगझगणाऱ्या जरतारी पोशाखात शांत उभे होते. पण भानाजीपंतांना प्रभू आपल्याला अभय देत आहेत असेच वाटू लागले. सांगताहेत भिऊ नकोस. अरे नारायणाच्या पाठीशी मी आहे. भानाजीपंतांच्या अंतरातल्या श्रीरामाने त्यांना दिलासा दिला.

भानाजीपंत घरी आले. नारायण ओसरीवर बसलेला होता. खाली दर्भासन होते. दर्भासनावर कंबलासन होते. कंबलासनावर धूतवस्त्र अंथरलेले होते. अंगावर लंगोटी शिवाय काहीच नव्हते. डोळ्यात निश्चलता होती. शरीरावर विरक्ती जाणवत होती. आतल्या आंत कोठेतरी साधना चालली असल्याची भानाजींना जाणीव झाली. त्यांना नारायणाने पूर्वी विचारलेल्या सगळ्या प्रश्नांची व आपण दिलेल्या उत्तरांची आठवण झाली. नारायण आता साडे सहा वर्षाचा झाला होता. सूर्याजीपंतांनी भानाजीपंतांना प्रथम आपल्या खोलीत नेले. श्रीरामचंद्रांच्या तस्वीरी समोर बसले. भानाजीपंतांना आपली व्यथा सांगितली. अहो! त्याच्या वयातच श्रेष्ठांचे लग्न केले होते. हा मात्र पहा कसा वागतो आहे! पाहिलेत नां आत्ता तुम्ही त्याच्या समोरून आलात पण त्याला ना आनंद, ना दाद ना फिर्याद. राणूबाईंनी पुस्ती जोडली. नीट जेवत

नाही. पाठशाळेतले शास्त्रीबुवा सांगत होते, येतो, शांत बसतो, शिकवलेले ऐकतो, म्हणून दाखव म्हटले तर बिनचूक म्हणून दाखवतो. त्यामुळे तक्रार काही नाही पण ते बरोबरीच्या मुलांसारखे वाटत नाही. इतर मुले वेगळी हा वेगळा. पूर्वी मस्ती करायचा पण आता बालसुलभ गोष्टीही करीत नाही. म्हणजे कुणी चिडवायचा प्रयत्न केला तर प्रौढ माणसासारखा शांतपणे त्याच्या पासून दूर होतो. एक ना दोन. असे सर्वांचे ऐकून भानाजीपंतांनी मनाशी काही निश्चय केला. काही दिवस जांबवातीस राहावयाचे. नारायणाच्या सहवासात त्याला समजून घ्यायचे. त्याला बोलते करायचे म्हणजे नक्की काय झाले ते समजेल.

भानाजीपंत हरीभक्त होते. शास्त्रसंपन्न होते. पंडित होते. कीर्तनकार होते. अनेक थोरामोठ्यांना त्यांनी अगदी जवळून पाहिले होते. त्यामुळे दैवीगुण आणि दंभ यातला फरक ते जाणत होते. नारायणात त्यांना दंभाचा लवलेशही दिसत नव्हता. स्वाभाविक आणि कृत्रिम व्यापार याची त्यांना चांगलीच पारख होती. नारायण हे एक रत्न आहे हे त्यांनी पूर्वीच पारखले होते. पण आता प्रश्न होता तो लोकापवादाचा! जिथे आपले मेव्हणे व बहिणच साशंक झाले आहते तिथे इतर लोकांना काय दोष द्यावा! त्यांनी खूप प्रयत्न केला. पण नारायणाचे गूढ त्यांना समजेना. सगुणभक्ति करतां करता भगवद् दर्शनामुळे अशी अवस्था येऊ शकते हे त्यांना शास्त्र ज्ञानातून समजलेले असले तरी पडताळा घेता आलेला नव्हता. आतां नारायणाने मोकळेपणे काही सांगितले तर पहावे असा त्यांचा प्रयत्न होता. पण नारायण सदैव एकटक कुठेतरी आकाशाकडे नजर लावून बसलेला असायचा. त्याला मधून मधून हसू यायचे! मधून मधून रडू अनावर व्हायचे! कधी कधी दर्भासनावर बसलेला असताना स्वतःच्या अंतरातल्या हुंकारातच दंग होई. भानाजीपंत विचारमग्न झाले. त्यांनी विचार केला, ही लक्षणे तर योगशास्त्रात सांगितलेली

कुंडलिनी जागरणाची स्पष्ट दिसत आहेत. पण पडताळा कसा घ्यावा ह्या विचारात ते होते. त्यांना एक युक्ती सुचली. नारायण बसला होता तिथे ते ज्ञानेश्वरीतला सहावा अध्याय काढून त्यातल्या ओव्या आपल्या मधुर आवाजात वाचू लागले. नारायण जरी स्वत:त मग्न व स्वस्थ होता तरी मामांचे शब्द त्याच्या कानावर पडणारच होते. शिवाय ते साक्षात् नाथपंथातल्या ज्ञानेश्वरांसारख्या सिद्ध पुरुषाचे मंत्ररूप शब्द होते. त्यांचा परिणाम झाल्या खेरीज रहाणार नाही याची भानाजीपंतांनी मनाशी खुणगाठ बांधली. मामा वाचत होते. "तरी विशेषे आता बोलिजेल | परि ते अनुभवे उपेगा जाईल | म्हणोनी तैसे एक लागेल | स्थान पहावे || जेथ आराणुकेचे नि कोडे | बैसलिया उठो नावडे | वैराग्यासी दुणीव चढे | देखलिया जें ||" मामा वाचत होते. नारायण अधिकाधिक मुग्ध होत होता. त्याचा श्वासोच्छ्वास दीर्घ व्हावयाला लागला. अकस्मात त्याच्या नाभी स्थानातून काही संवेदना निर्माण होऊन कंठातून ॐकाराचा ध्वनी प्रगट होऊ लागला. त्यात मंजूळतेसह तीव्रता होती. इकडे मामा वाचतच होते. "तव येरीकडे धनुर्धरा | आसनाचा उबारा | शक्ती करी उजगरा | कुंडलिनीते || नागिणीचे पिले | कुंकुमे नाहले | वळण घेऊन आले | शेजे जैसे || ......मामा वाचता वाचता नारायणाकडे पहात होते. नारायण सावधच होता. त्याला हे सर्व ऐकून काही विशेष जाणवत होते. त्याला मामांशी काही हितगुज करावेसे वाटत होते. पण कोणती तरी अज्ञात शक्ती त्याला बोलू देत नव्हती. मामा वाचतां वाचतां एका ओवी जवळ आले .."त्या हृदयाच्या पारिवरी | कुंडलीनिया परमेश्वरी | तेजाची शिदोरी | विनियोगीली || बुद्धीचेनि शाके | हातबोने निके | द्वैत तेथ न देखे | तैसे केले ||..." आणि मामांनी नारायणाकडे पाहिले. नारायणाने आवेगाने डोळे उघडून त्याचवेळी मामांच्याकडे पाहिले. दोन ज्योती जणू समोरासमोर आल्या.

तेजाची ओळख तेजाला पटली. नारायण आवेगाने उठला. मामांच्या चरणावर मस्तक टेकता क्षणीच नारायणाच्या नेत्रातून अनावर अश्रुपात होऊ लागला. त्याचे सर्वांग थरथरत होते. नारायण त्यावेळी सात वर्षाचा झाला होता. मामांनी नारायणाचा आवेग कमी होऊ दिला. त्यांनी नारायणास आवेगाने आपल्या जवळ ओढले आणि मांडीवर घेतले. नारायण नि:संकोच त्यांच्या मांडीवर बसला. मामांनी हळूच विचारले, “नारायणा माउलीच्या शब्दाबरहुकुम अनुभव घेतलास नां! ” नारायण पटकन “ हो ” म्हणून गेला. त्याचे हृद्गत मामांनी ओळखले म्हणून प्रभावित झाला. आनंदित झाला. त्याचा आत्मविश्वास वाढला. चला कोणी तरी आता आपल्याला समजून घेणार तर. मामांनी विचारले, “कसे घडले रे! ” नारायणाने नि:संदिग्ध शब्दात घडलेली सर्व हकीकत सांगितली आणि म्हणाला, “मामा सत्य कीं स्वप्न हा माझ्या समोरचा प्रश्न नाही कारण जी अनुभूती मी आत्ता घेत आहे त्याचा अन्वय सत्य व मिथ्या यांना भेदून जाणारा आहे.” मामांनी त्याला हृदयाशी कवटाळले. म्हणाले, “नारायणा! भाग्यवान आहेस. अरे तुला तर प्रत्यक्ष मारुतीरायाने मंत्रदीक्षा दिली आहे. श्रीरामांनी प्रत्यक्ष प्रकट होऊन आशीर्वाद दिला आहे. आणखी काय हवे? असे भाग्य कितीजणांना मिळते?” ह्यावर नारायण म्हणाला, “ते खरे असेल मामा, पण याला काय भाग्य म्हणायचे? अहो त्या दिवसा पासून मी सारखा तळमळतोय प्रभुरामचंद्रांना भेटायला! सतत धावा करतोय पण आतां साधे दर्शनही घडत नाही. जेंव्हा घडले तेंव्हा मी बावरलो होतो. त्यांना घट्ट मिठी मारायची राहून गेली. ते चरण कधीच सोडू नयेत. पण त्यावेळी तसे जमले नाही. आता तसे जमावे असे वाटते पण भेट होत नाही म्हणून जीव कासावीस होतोय.” अत्यंत भावविवश होऊन नारायण हे सांगत होता. मामा कौतुकाने ऐकत होते. नारायण वयाच्या मानाने किती नि:संदिग्ध

व धोरणीपणाने बोलत होता. त्यांना अपरिमित कौतुक वाटले. त्यांची पूर्ण खात्री पटली कीं ह्याची आता खरी साधना सुरु झालेली आहे. साक्षात प्रभुरामचंद्रच ह्याची काळजी घेत आहेत. हा आतां आपल्यातला उरलेला नाही. भगवंताशी एकरूप होण्याच्या साधन मार्गात हा फारच झपाट्याने पुढे चाललेला आहे. मामांची खात्री पटली खरी पण समाजाचे काय? त्यांना जास्त काळजी वाटू लागली ती सूर्याजीपंत व राणूबाईची! त्यांची समजूत कशानेच निघणार नव्हती. पण मामांना तो उपचार करावा लागणार होता.

भानाजीपंतांनी सूर्याजीपंत व राणूबाई यांना खूप समजाऊन सांगितले. पण त्या मातापित्यांना राहवत नव्हते. नारायण असाच वागत राहिला तर त्याला मुलगी कोण देणार? त्याचे लग्न कसें होणार? इत्यादी अत्यंत व्यावहारिक प्रश्न त्या माता-पित्यांना भेडसावत होते. तेच प्रश्न त्यांनी भानाजीपंतांच्या पुढे मांडले. राणूबाई भावाला म्हणाल्या “तूं कीर्तनानिमित्त गावोगावी फिरतोस. नारायणासाठी चांगली मुलगी पहा. सोयरिक जुळवून दे. एकदा कां त्याचे दोनाचे चार हात झाले कीं मग तो माणसांत येईल.” बहिणीच्या समजुतीसाठी भानाजी हो म्हणाले. त्यांच्या मते घाई करण्याची आवश्यकता नव्हती. भानाजी जड अंत:कारणाने सर्वांचा निरोप घेऊन तेथून निघाले.

नारायण आपल्या साधनेत मग्न असायचा. कोणाशी बोलणे नाही. कुठे जाणे नाही. मुलांमध्ये खेळणे नाही. पाठशाला झाली कीं घरी. कधी कधी उठायचा ब्रह्मारण्यात जायचा. जिथे श्रीराम दर्शन झाले होते तिथे येऊन आकाशाकडे दृष्टि लावून बसायचा. मग कशाचीच शुध्दबुध्द राहायची नाही. दिवस दिवस असा बसून काढायचा. कोणी त्या बाजूला फिरकलेच तर धनगर फिरकायचे. नारायणाला पाहून गावांत खबर द्यायचे. घरून कोणीतरी जाऊन

नारायणास परत आणायचे. सूर्याजीपंतांना प्रश्न पडायचा हे असे किती दिवस चालणार? ते हर प्रकारे नारायणास समजाऊन सांगायचे पण उपयोग होत नव्हता. नारायणाची स्थिती त्यांना समजत नव्हती.

दैववशात जें घडायचे ते आकस्मिक घडते. ध्यानी मनी नसताना. तो दिवस असा उजाडला कीं त्या दिवशी सूर्याजीपंतांनी इहलोकीची यात्रा संपवली. नारायण अवघा सात वर्षाचा होता. श्रेष्ठांच्या वर सगळी जबाबदारी आली. गावांत प्रतिष्ठा होतीच. श्रेष्ठ ती अत्यंत कुशलतेने सांभाळीत होते. श्रेष्ठांच्या वागण्यात आता पूर्वीपेक्षा अधिक गांभीर्य प्रकट होऊ लगले. राणूबाईंना श्रेष्ठांचा फार मोठा आधार वाटायचा. नारायणाच्या वागण्याकडे त्या कानाडोळा करावयाच्या.

कशी बशी चार वर्षे गेली. नारायण साधनेत मग्न असायचा. लोकांना प्रथम प्रथम कौतुक वाटायचे पण नंतर सरावाने अंगवळणी पडले. असाधारण म्हणून मधून मधून टीका करू लागले. तसा राणूबाईंचा धीर खचू लागला. त्या श्रेष्ठांजवळ नारायणाच्या विवाहाचा आग्रह धरू लागल्या. आपल्या भावालाही कळवले. नारायणास ही कुणकुण लागली. तो सावध झाला. हनुमंताची व श्रीरामांची प्रार्थना करू लागला. एकांतात जाऊन स्वत:शीच संवाद करू लागला. एक मन म्हणे, “अरे त्यात काय आहे, करतात लग्न तर करू दे. तुझे काय जाते त्यात! नाथमहाराजांनी नाही कां संसार केला? सदृशं चेष्टते स्वस्या: प्रकृतेर्ज्ञानवानपि | प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रह: किं करिष्यसि || हो पण नाथ महाराजांना त्यांच्या सद्गुरूंची तशी आज्ञा झाली होती. आपल्याला कुठे तशी आज्ञा झालेली आहे? आणि पुढे तर भगवान श्रीकृष्ण स्वत:च सांगतात कीं इंद्रियस्येन्द्रीयस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ | तयोर्न वशमागच्छेतौयस्य परिपंथिनौ ||” नारायण मनातल्या मनात संवाद करायचा.

मग मन एकाग्र करून अंतरातल्या प्रतिसादाचा वेध घ्यायचा.त्याला खोल हृदयाच्या आतून उन्मेष यावयाचा. वृत्ती स्थिर व्हायची. तो शांतपणे समजून घ्यायचा. त्याला त्याचा आत्मारामच सांगायचा, " नाही! नारायण हे काही खरे नाही. तूं ह्या लग्नाच्या जंजाळात अडकून पडू नकोस! तुझी अवस्था ही अशी! विरक्तीच्या डोहात डुंबायची तुझी प्रवृत्ती झालेली. अशावेळी तूं संसार काय करणार? तूं इथे थांबू सुद्धा नकोस. इथे सारेच तुझ्यापेक्षा वडील आहेत. तुला त्यांचे ऐकावेच लागेल. न ऐकले तरी दोष आणि ऐकलेस तर तुला भावणार नाही. तूं घरच सोड! सर्वसंग परित्याग केल्या शिवाय देव भेटत नाही हेच मामांनी सांगितलेय आठवते नां?" "पण मग जाऊ कुठे? कोठेही गेलो तरी माझा शोध घेणारे तिथे येणारच. आणि मग पुन्हा घरीच नाही कां यावे लागणार?" "त्याची काळजी करू नकोस. भगवद्गीता वाचतोस नां! भगवंताचे आश्वासन विसरलास काय?.... अनन्याश्चिन्त्ययन्तो मां ये जना: पर्युपासते | तेषांनित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ||.... तूं योगक्षेमाची काळजी करू नकोस. कुणालाही आपला परिचय देऊ नकोस. कोण ओळखणार? प्रथम भ्रमण कर. ज्ञानेश्वरी आठव 'अवघाची आकाश स्थिती | जेवी वायुस नित्य वसति | तेवी जगची विश्रांती | स्थान जया || हे विश्वची माझे घर | ऐसी मति जयाची स्थिर | किंबहुना चराचर | आपण जाहला ||'"

नारायण एकाएकी स्थिर झाला. त्याने ठाम निश्चय केला. लग्न करून संसारात पडायचे नाही. त्याने मनोमन प्रभुरामचंद्रांची प्रार्थना केली. मनातल्या मनात जन्मदा मातेची क्षमा मागितली. पण मनोमन निश्चय केला. आतां नारायणास कसलेच भय उरले नाही. तो फक्त वाट पहात होता.

नारायण सदैव साधनेत मग्न असायचा. त्यामुळे राणूबाईंना काळजी वाटायची. त्यांना नारायणाची विरक्ती बोचत राहायची. नारायण आतां चांगला

बारा वर्षांचा झाला होता. राणूबाईंनी नारायणाच्या लग्नाचा प्रस्ताव श्रेष्ठांपुढे मांडला. राणूबाईंनी आपल्या भावाला भानाजीपंतांना पुन्हा एकदा गळ घातली. भानाजींनी होकार दिला. भानाजींनी आपली कन्या दुर्गा नारायणास द्यायची ठरवली. राणूबाईंचा आनंद गगनात मावेना. श्रेष्ठांची पत्नी पार्वती आपल्या दिराची थट्टामस्करी करू लागली. पण आपल्या दिराची शांतता पाहून न राहवून वहिनी म्हणाल्या “भावजी! काय प्रकार आहे? मुलगी पसंत नसेल तर तसे स्पष्ट कां सांगत नाही?असे मुग्ध राहणे बरे वाटत नाही.” नारायण तरीही शांतच. त्याची काहीच प्रतिक्रिया नसायची. त्यामुळे त्याच्या मनाचा कुणालाच थांग लागत नव्हता.

लग्नाचा दिवस ठरला. वऱ्हाड जांबवतीहून वाजत गाजत थाटामाटात आसनगावी जाण्यास निघाले. आसनगावी मामांचा वाडा गजबजून गेला होता. आंब्याच्या पानांचे व झेंडूच्या फुलांचे तोरण चढले होते. प्रवेशद्वार दोन्ही बाजूला जय विजयांच्या चित्रांनी सुशोभित करण्यात आले होते. मोठ मोठ्या जाजम, सतरंज्या, गाद्या लोड , तक्के इत्यादी बैठकांचा थाट ओट्यावर केला होता. अंगणात गेरुनी रंगवून फुलांनी सजवलेले बोहले तयार केले होते. वातावरणात आनंद तरळत होता. राणूबाईंना हायसे वाटत होते. कारण कबूल केल्या प्रमाणे नारायण लग्नाला तयार झाला याचाच त्यांना आनंद होता. नुकत्याच वयात आलेल्या सुनांना त्यांच्या सासवा सजवून नटवून, नथी वगैर घालून तयार करीत होत्या. भरजरी शालू पांघरवीत होत्या. त्यांच्या उत्साहाला उधाण आले होते. पेढ्यांची ताटे सजवली जात होती. फुलांच्या सुंगण्या तयार करून मोठ्या तबकात सजवून ठेवल्या होत्या. पान-सुपारी देण्यासाठी पानदाने तयार केली होती.

लग्न मुहूर्त जवळ येत होता. नारायणास मुंडावळ्या बांधून बोहल्यावर उभा केला होता. त्याच्या हालचालीत प्रचंड अलिप्तपणा होता. तो श्रेष्ठांना व भानाजीपंतांना जाणवत होता. अंतरपाट धरला गेला. शुभमंगल सावधान झालं. अक्षतांचा पाऊस पडला. मुहूर्ताची वेळ होत आली. गुरुजींनी उच्चरवात "सावधान" म्हणून हात उंचावून सर्वांना थांबवले. आणि स्वत: "ताराबलं चंद्रबलं तदेव........" म्हणू लागले. त्यांनी पुन्हा एकदा उच्च रवात सावधानचा घोष केला. आणि काय घडतेय हे समजण्याच्या आधीच मंगलाष्टकाचा त्या गजराचा घोष पूर्ण होण्याच्या आतच नारायण चपळाईने सर्वांच्यामधून वाट काढून मागच्या दाराने धूम पळाला. बोहल्यावरून नारायण पळाला हे लक्षात येण्यास काही क्षण लागलेच. कारण अंतरपाट धरलेले गुरुजींनी "ताराबलंच्या........" आवेशात डोळे मिटून घेतलेले होते. त्यांना हे कळलेच नाही. नारायणाच्या मागे उभ्या असलेल्यांना पण ही कल्पना येणे अस्वाभाविक होते. त्यामुळे अतर्क्य घटना घडली! नारायण पळाला! त्याने मुंडावळ्या पाटावर काढून ठेवल्या होत्या. पगडी पण तिथेच काढून ठेवली होती. त्यामुळे बाहेर जाणारा हा नारायण आहे अशी कुणला शंकाही आली नाही. कारण जो तो आपल्याच नादात होता. पण नारायण खरा सावध होता. म्हणूनच तो बाहेर पळून जाऊ शकला.

असामान्य घटना घडली होती. नारायणास कल्पना होतीच कीं पाठलाग हा होणारच, म्हणून तो आडमार्गाने धांवत होता. प्रथम त्याने आडरानाची वाट धरली. लपून छपून दिवस मावळून अंधारे पर्यंत एका झाडावर लपून बसला. मनोमन तो श्रीरामाचा धावा करीत होता. नारायणाची अटकळ खरी ठरली. पाठलाग तरी कोण आणि किती काळ करणार? त्याने रात्रीच मार्ग आक्रमण करण्यास सुरवात केली. प्रथम त्याने अंगावरचा पांढरा

शुभ्र पोषाख काढून टाकला. काचा मारून एक लंगोटी ठेवली. गळ्यात उपरण्याची चौपदरी करून अडकवली. आवश्यक वाटल्यास सोडलेले धोतर चौपदरीत ठेवले. बोटातली अंगठी, गळ्यातला गोफ, कानातली भिकबाळी या सर्वांना त्याने गोदावरीस अर्पण केले. काट्याकुट्यातून धावल्यामुळे पायाला झालेल्या जखमा त्याने गंगेच्या पाण्याने स्वच्छ केल्या. मध्यरात्र होत आली. मार्गक्रमणा करायला हवी होती. नदीकाठाने चालण्याचा विचार मनात होताच. क्षणकाल कल्पनेने त्याच्या डोळ्यासमोर भानाजीपंत उभे राहिले. नारायण थोडा गडबडला. त्याला वाटू लागले आपण मामांचा अपराध केला. पण तत्क्षणी त्याला मामांचा शांत व स्वच्छ चेहरा आठवला. त्यांनीच सांगितले होते "भगवंताची भेट हवी असेल तर सर्वसंग परित्याग करावा लागतो." आजपर्यंत मामांच्या सहवासात झालेले सगळे संवाद त्याला आठवले. मग त्याचे चित्त पुन्हा शांत झाले. त्याच्या लक्षात आले कीं मामा स्वत:च नाथमहाराजांचे शिष्य आहेत. त्यांच्या अंगात परमार्थ मुरलेला आहे. त्यांनी आपण होऊन लग्नाबद्दल कधीच विचारले नव्हते. अथवा माझ्या बरोबर लग्न होणार म्हणून कधी आनंदही व्यक्त केला नव्हता. नारायणाच्या मनात त्यांच्याबद्दल परम आदर होता तो द्विगुणीत झाला. त्याच्या मुखातून सहज शब्द बाहेर आले " खरच साधू , साधू आहेत मामा! " मग नारायण एकदम शांत झाला. त्याच्या मनावरचे दडपण नाहीसे झाले. देवाच्या सख्यत्वासाठी त्याने सर्वस्वाचा त्याग केला होता, त्यात त्याला कोणाचाही उपमर्द करावयाचा नव्हता. तसेच त्याला स्वत:च्या ह्या कृत्याचा अभिमानही नव्हता. होता फक्त विनय. होती फक्त लीनता. होती फक्त भगवंताची ओढ. अंत:करणात नामस्मरण चालूच होते पण त्याकडे दुर्लक्ष झाल्याची नारायणास जाणीव

झाली. त्यामुळे नारायणास अपराध्यासारखे वाटू लागले. पुनश्च अनुसंधान साधताच त्याला शांत वाटू लागले. मन नि:शंक झाले.

रात्रीचा तिसरा याम संपून पंच पंच उष:काल होत होता. नारायणाने एकवार मनातल्या मनात आपल्या मातेला, मामांना, श्रेष्ठांना, दिवंगत पित्याला स्मरण पूर्वक नमस्कार केला. नारायण मार्गक्रमणा करीतच होता. चालण्यात उत्साह तसाच होता पण त्वरा नव्हती. पाय थोडे थकले होते. झुंजू मुंजू होईपर्यंत आपण नक्की कुठे आहोत हेही समजणार नव्हते. आकाशातील नक्षत्रे आता दिशा बदलून फिकी दिसू लागली होती. म्हणजे थोड्याच वेळात उजाडेल. मग मार्गही समजेल. आपण नुसते चालत होतो. कुठे जायचे हेही नक्की नव्हते. श्रीरामावर भरवसा टाकून नारायण नदीकांठी स्वस्थ बसला. त्याला हलके व मोकळे मोकळे वाटू लागले. मायापाशाचे सर्व बंध झुगारून दिल्यामुळे आलेल्या मानसिक थकव्याने त्याचा डोळा लागला. त्याला दोन्ही परिश्रम झालेले होते शारीरिक आणि मानसिक!

# २.

||श्रीगुरू:शरणं||

|| जयजय रघुवीर समर्थ ||

पहाटेचा मंद वारा अंगाला सुखावत होता. नुकतेच तांबडे फुटायला लागले होते. रानातल्या पक्षांची किल्बील मनाला आल्हाद देत होती. सारा परिसर शांत होता. गोदावरी संथ वाहात होती. नारायणाने ग्लानी झटकली. प्रात:स्मरण करून उठला. स्वच्छ स्नान केले. प्रात:संध्या केली. जवळ भस्म नव्हते म्हणून गंगामृत्तिका वापरली. आत्ता त्याला भूक लागली होती. पण खाणार काय? त्याला उपवासाची संवय होती. पण हा उपवास वेगळा होता. घरच्या उपवासा नंतर तो सुटण्याची निश्चिंतता होती. आता तशी निश्चिंती कोठें? क्षणकाल नारायण अस्वस्थ झाला. जंगलाच्या दिशेने धावत सुटला. त्याला या सर्वच्या पार व्हायचे होते. कुणाच्या नजरेला पडायचे नव्हते. उपवास तर उपवास. जशी श्रीरामांची इच्छा असेल तसे घडेल. अन्यथा आपण इथे येऊच शकलो नसतो. एका प्रशस्त वटवृक्षाखाली जागा साफसुफ केली. चौपदरीतले वस्त्र काढून ते दुहेरी अंथरले. त्यावर ध्यान लावून बसला. किती कालावधी गेला हे त्याला कळले नाही. पण दूरवर कुठेतरी वर्दळ सुरु झाल्याचे त्याला जाणवले. त्याला सपाटून भूक लागली होती. पण खायचे काय? त्याने तेथून निघायचे ठरवले. त्याला थोडी मौज वाटली. कोणी विचारणार नव्हते कोठे निघालास म्हणून. अथवा तेथेच बसला तरी म्हणणार नव्हते किती वेळ बसणार? त्याला हा अनुभव नवीनच होता. प्रत्येक निर्णय त्याचा असणार होता. चूक कीं बरोबर कोण ठरवणार? त्याने बरोबर कोणती पोथी

घेतलेली नव्हती कीं अध्ययनाचा पाठ घेतलेला नव्हता. त्यामुळे मार्गातून चालता चालता तो भगवद्गीता म्हणू लागला. अध्याया मागून अठराही अध्याय म्हणून झाले. त्या नादात तो कितीतरी चालून गेला. उन्हे माथ्यावर सरकू लागली होती. नदीकांठची वाळू तापायला लागली होती. पायाला ते चांगलेच जाणवू लागले होते. नारायण थांबला. दूरवर कोठे तरी वस्ती असल्याचे त्याला जाणवले. त्याने पुनश्च गंगेच्या पाण्याने स्नान केले. ओंजळी भरभरून यथेच्छ पाणी प्याला. रिकाम्या पोटी पाणी कां पितोस म्हणून विचारणारे कोण होते? समोरच त्याने एक कडुनिम्बाचे झाड पहिले. त्याला आठवले. हनुमंत फक्त कडुनिम्बाचा पाला खात असत. केंव्हातरी कीर्तनात ऐकले होते. त्याला ती कल्पना फार आवडली. पटकन उठला. नुसत्या लंगोटीवर झाडावर चढला. भरपूर पाला काढून खाली उतरला. आपल्या झोळीत भरून घेतला. खाता येईल तितका खाल्ला. प्रथम खायला जमेना. पण मामांनी कीर्तनात सांगितलेले आठवले. “माउली म्हणते, श्रोत्रादी इंद्रिये आवरती | परि रसने नियमू न करिती | ते सहस्त्रधा कवळती | विषयी इही ||” छे आपल्याला रसना आवरलीच पाहिजे. ठाम निश्चय करून नारायणाने पाला चघळायाला सुरुवात केली. नकोच ती चव. त्याच्या तोंडाची चवच गेली. पण ही तर स्वेच्छेने पत्करलेली फकिरी होती. त्याने परत गंगाजल प्राशन केले. आता जरा बरे वाटले. म्हणून एका झाडाखाली विश्रांती घेतली. तो वर्दळी पासून दूर रहात होता. गोदावरीच्या कांठाने मार्ग आक्रमत होता. दोन दिवस चालत राहिला. कडूनिंबाचा पाला खाऊन पोट जड झाले होते. भूक लागेनाशी झाली होती. थोडे कलमलल्यासारखे होऊ लागले. शौचाला

होत नव्हती. पाणी पिण्याची इच्छा असून पाणीही पिववत नव्हते. हा सारा त्या कडूनिंबाचा प्रभाव होता.

पण आता माघार नाही. ह्या निश्चयाने हनुमंताचे व श्रीरामाचे स्मरण करीत नारायण चालत राहिला. त्याला वाटू लागले आपण खरच एकाकी आहोत. आपल्याला आई नाही, भाऊ नाही, वहिनी नाही कोणी कोणी नाही. मग मी कोण? मी कोण हा प्रश्न त्याने स्वमनात इतक्यावेळा विचारला कीं त्याला मनापासून वाटू लागले कीं आपण कोणीच नाही! तरी हा देह उरतोच. ही भूक उरतेच. हे भगवन्नामस्मरण कसें होते? मग पूर्वी हनुमंताने जी भेट दिली व प्रभूरामचंद्रांनी दर्शन दिले ते काय खोटे! काय ते फक्त स्वप्न! आपण त्यावेळी मामांना म्हणालो होतो "मामा, जागृती कीं स्वप्न हे मला माहित नाही. पण येणारी अनुभूती सत्य आणि मिथ्या यांना भेदून जाणारी आहे." काय बोललो होतो आपण? ते आपण कोण? ती अनुभूती कोणाची? नारायणाच्या मनात विचारांचे थैमान सुरु झाले. "मी"चा शोध त्याला अस्वस्थ करूं लागला.

नारायण अत्यंत व्याकूळ झाला. एका झाडाखाली बसला. त्याचा जीव आता फक्त एकाच गोष्टीमुळे व्याकुळ झाला. ' मी ' चा शोध. तहान हरपली भूक हरपली, तो पूर्णच विचारात गुरफटला. मनोमन श्रीरामांना शरण गेला. त्याला काही समजेना. आपण करतोय ते चूक आहे कीं बरोबर आहे? चूक असेल तर चूक काय? बरोबर असेल तर बरोबर तरी काय? चूक बरोबरची सीमारेषा तरी कोणची? मीच नसेल तर चूक पण नाही आणि बरोबर पण नाही. मग हे आहे तरी काय? देवा! प्रभो सांभाळा! आतां अंत पाहू नका. प्रभो आता हीच वेळ. मला मार्ग दाखवा. मी हीन दीन आहे. आपल्या चरणाशी आलो आहे. मला आपल्याशिवाय काही नको

आहे. मला आपला म्हणा. नारायण अंत:करण एकवटून आर्त होऊन प्रार्थना करीत होता. त्याला किंचित ग्लानी आली. अगदी जागृती आणि सुषुप्ती यांची ती सीमारेषा! त्याला लख्ख प्रकाशल्यासारखे वाटले. त्याला शांत आवाज आला. काळजी करूं नकोस! असाच पुढे जा! पंचवटीला जाऊन श्रीरामाचे दर्शन घे. मग तुझे तुलाच कळेल पुढे काय करायचे ते! जा! “उद्धरेदात्मनामानं नात्मानमवसादयेत् | आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मन: ||” नारायणाला भगवद्गीतेतला तो श्लोक प्रकर्षाने आठवला. आतां कुठे जायचे हे निश्चित झाले. मार्ग तर कळला. नारायण मनांत स्थिरावला.

मग मात्र नारायणाने वेळ गमावला नाही. त्याच्या अंतरात पंचवटीतल्या श्रीरामाची ओढ निर्माण झाली. तो झपाझप मार्ग आक्रमू लागला. केंव्हा एकदा पंचवटीस जातो आणि श्रीरामाच्या पायावर डोके ठेवतो. असे त्याला होऊन गेले. नारायणाचा अवतार दोन दिवसातच साफ बदलून गेला होता. अंग उन्हाने रापले होते. पायाला फोड आले होते. थंड वाटावे म्हणून नारायण डोक्यावर एरंडीची पाने घेत होता. रात्री झोपताना पायाला कडुनिम्बाचा पाला चोळत होता. पहाटे उठल्यावर स्नान संध्या झाली कीं पंचवटीच्या दिशेने पुढे सरकत होता. मिळेल तो रानमेवा खाऊन समाधान मानत होता. त्याला आतां ओढ लागली होती ती श्रीराम दर्शनाची! त्यासाठी तो वाट्टेल त्या दिव्व्यास तयार होता. त्याचा हा हट्ट “श्रीराम” त्याच्या अंतरात बसून पहात होते. मनोमन त्याला आधार देत होते. आशीर्वाद देत होते. फाल्गुन शुध्द अष्टमीस नारायण बोहल्यावरून पळाल्याला आता आठ दिवस झाले होते. नारायण मंत्रमुग्ध झाल्या सारखा चालत होता. मार्गक्रमण करीत होता. जनसंपर्क टाळीत

होता. झोपायला प्रशस्त भूमी होती. पांघरायला आकाश होते. प्रतिपदेच्या आत नारायणास पंचवटीला पोहोचण्याची तीव्र इच्छा झाली. नारायण उत्तर किनारा टाळून दक्षिण किनाऱ्यावरून जात होता. त्याला ओढ होती श्रीराम भेटीची. सगळ्या दिव्व्यातून पार होऊन नारायण चैत्रशुध्द प्रतिपदेस शके १५४२ या दिवशी पंचवटीच्या राममंदिरात येऊन पोहोचला.

मंदिरात चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून रामनवमीपर्यंत मोठाच उत्सव होता. नारायणाला श्रीरामाचे दर्शन होताच शांत वाटू लागले. श्रीरामांच्या गोजिरवाण्या व भरजरी कपड्यांनी सजवलेल्या मूर्तीकडे तो स्तब्ध होऊन पहात राहिला. नवरात्राच्या उत्सवामुळे मंदिरात नेहमीपेक्षा अधिक गजबज होती. मंदिर तोरण, पताका, माळा, केळीचे खुंट, आंब्याची पाने, फुले, इत्यादींनी सुशोभित केले होते. समोर मंडप घातलेला होता. मंडपात कीर्तनाची व्यवस्था केलेली होती. चोवीस तास हरीनामस्मरणाची व्यवस्था एका बाजूला दिसत होती. नामधारक वीणा घेऊन तेवढ्या जागेत फेऱ्या मारीत होता. एकमेकांना अबीर लावून भाविक वीणेची देवाण घेवाण करीत होते. सगळे कसे अगदी शिस्तबद्धतेने चालले होते. पण नारायणाचे ह्या कोणत्याच गोष्टीकडे लक्ष नव्हते. त्याचे लक्ष केंद्रित झाले होते ते श्रीरामचरणी. श्रीरामांना पाहून नारायणाचा भावावेग अनावर झाला. त्याचे अष्टसात्विक भाव जागे झाले. त्या गर्दीतही त्याला गाभाऱ्यातल्या एका कोपऱ्यात जागा मिळाली. तो अनिमिष नेत्रांनी श्रीरामांना न्याहाळत होता. कोणते ध्यान त्याच्या हृदयात ठसावत होते? जें त्याने ब्रह्मारण्यात पाहिले होते तेच त्याच्या हृदयात प्रकटले. जडमूर्तीचा केवळ उपचार होता. इथे नारायण प्रभूश्रीरामांना स्वत:च्या

हृदयसिंहासनावर आरूढ झालेले पहात होता. त्याला कशी कोण जाणे पण श्रीरामच आपले गुरु असल्याची जाणीव झाली. त्यांनीच आपल्याला श्रीहनुमंताच्या हाती सोपवले आहे. क्षणाक्षणाला नारायणाचा श्रीरामां बद्दलचा गुरुभाव वृद्धिंगत होऊ लागला. त्याला सारे अनावर झाले. श्रीगुरु म्हणजेच श्रीराम व श्रीराम म्हणजेच श्रीगुरु! देहभान हरपून नारायण अनुभवू लागला.

" आणि अभ्यंतरिलिये कडे | प्रेमाचेनि पवाडे | श्रीगुरुचे रुपडे | उपासी ध्यानी ||ज्ञा.१३.३.८४|| हृदयशुद्धीच्या आवारी | आराध्यु तो गुरु करी | मग सर्व भावेसी पारिवारी | आपण होय ||८५|| कां चैतन्याचिये पोवळी | माजी आनंदाच्या राऊळी | गुरुलिंगा ढाळी | ध्यानामृत ||८६|| -----

आहाहा! श्रीज्ञानेश्वरमाउलीने केलेले वर्णन नारायणाच्या ह्या अवस्थेला तंतोतंत लागू पडत होते. सर्वसंग परित्याग करून लग्नाच्या बोहल्यावरून पळालेला नारायण ज्या अद्वितीय अनुभूतीसाठी वेडावला होता ती अनुभूती त्याला आली. त्याचा बावीस दिवसांचा पूर्ण श्रम परिहार झाला. त्याचा श्रीरामांविषयी गुरुभाव इतका तीव्र झाला कीं त्याला स्वत:चे असे काही उरलेच नाही. तो श्रीराममय होऊनच सर्वकाही पाहू लागला. वर्दळ कमी होत आली. माध्यान्ह टळू लागली होती. नारायण कोपऱ्यातून हाललाच नव्हता. श्रीरामांसमोर थोडी जागा होताच त्याने पुढे होऊन श्रीराम चरणी घट्ट मिठी मारली. तो गदगदून रडू लागला. काही काळ गेला. या पोराला कसले दु:ख झाले म्हणून अनभिज्ञ ब्राह्मण पुजारी अवघडल्या सारखे त्याच्याकडे पाहू लागले. त्यांना काय ठाऊक कीं, ह्या बाल ब्रह्मच्याऱ्याला परब्रह्म भेटल्याचा हा आनंद आहे म्हणून! नारायणास शब्द

सुचत नव्हते. काय बोलावे हे समजत नव्हते. म्हणून त्याने हा रुदन संवाद आरंभला होता.

त्या भावसमाधीतून त्याला शुद्धीवर आणले एका वृद्ध गृहस्थाने. मस्तकी शुभ्र पागोटे, तितकेच शुभ्र उपरणे, तितकीच शुभ्र पैरण, शुभ्र धोतर. त्या वृद्धाच्या हातात काय जादू होती कोणजाणे पण नारायण सुखावला. त्या वृद्ध गृहस्थाला नारायणाने जराही विरोध दर्शवला नाही. त्या वृद्धाने नारायणाचा हात धरला. त्याच्याशी काही न बोलता नारायणाला स्वत: बरोबर घेऊन निघाला. ब्रह्मभावात असलेला नारायण नि:संकोच निघाला. त्यात ह्या वृद्धाच्या हस्तस्पर्शाने तो मंत्रमुग्ध झाला होता. दोघे तपोवन ओलांडून एका खेड्या जवळ आले. त्या खेड्या जवळून एक छोटी नदी वहात होती. ती गोदावरीला जिथे मिळते त्या संगमी ते दोघे आले. नारायण नि:शब्द होता. तो वृद्धही काही बोलत नव्हता. संगमी आल्यावर त्या वृद्धाने नारायणासह संगमात स्नान केले. मग नारायणास म्हणाला " जा बाबा! थोडी माधुकरी मागून आण. पंचवटीतल्या रामाला दाखव आणि मग प्रसाद म्हणून घे! " नारायण निर्विकल्प होता. जवळची चौपदरी खांद्याला अडकवून लगेच निघाला. पंचवटीत तीन घरी भिक्षा केली. त्याने केलेला "ॐ भवति भिक्षांदेही" चा खणखणीत घोष घरातल्या सती साध्वींना मंत्रमुग्ध करीत होता. त्या मनमोकळेपणे भरपूर भिक्षा घालीत होत्या. मिळाली ती भिक्षा घेऊन नारायण राम मंदिरात गेला. श्रीरामांना नैवेद्य अर्पण केला. आणि उर्वरित भिक्षा घेऊन संगमावर परतला. तो वृद्ध ब्राह्मण नारायणाची वाट पहात एका झाडाखाली शांत बसलेला होता. नारायणाने आणलेली भिक्षा त्या ब्राह्मणाला दिली. त्या वृद्धाने नारायणासह भिक्षा घेतली. नारायणाने

थोडेच खाल्ले. आज बावीस दिवसां नंतर तो अन्न खात होता. नारायणाने काही विचारण्या आधीच त्या ब्राह्मणाने नारायणास विचारले, “पुढचा बेत काय आहे?”

नारायण अभावितपणे म्हणाला, “काहीच नक्की नाही! पण आपण कोण?”

“तूं कोण आहेस?”

नारायण चमकला. त्याला ओळख द्यायची नव्हती. पण या वृद्धाने काय जादू केली हे त्याला समजेना! तो चटकन बोलून गेला

‘आपण कोण?’ उत्तरासारखे प्रत्युत्तर येते! आतां आली कां पंचाईत!

नारायण म्हणाला, ‘तेच तर माहित नाही कीं मी कोण?’

वृद्ध गंभीर हसला. म्हणाला, ‘अरे मग आधी स्वत:ची ओळख करून घे, मग तुला दुसऱ्याची ओळख आपोआप पटेल.’

‘त्याच प्रयत्नात आहे! पण “मी” ची ओळख पटण्यासाठी नक्की काय करावे?’

“मी”चा त्याग! ”

“तो कसा करायचा?”

“संकल्पाने! ”

“त्यासाठी काय करू?”

“तप! ”

“कोणते?”

“गायत्रीचे पुरश्चरण! ”

नारायणास हायसे वाटले. त्याला एका अनामिक आनंदाच्या उर्मिंनी प्रभावित केले. नारायणाने त्या वृद्ध ब्राह्मणास नमस्कार केला. त्या वृद्ध

ब्राह्मणाने आशीर्वाद दिला. “समर्थ व्हा! , रामदास व्हा! जगदुद्धार करा! श्रीराम! ”

नारायण क्षणातच श्रीरामनामात मग्न झाला. त्या वृद्ध ब्राह्मणाने नारायणाच्या मस्तकाला स्पर्श केला. परत भेटू म्हणून तो वृद्ध ब्राह्मण तेथून निघून गेला. त्या वृद्ध ब्राह्मणाचा सहवास नारायणास फार प्रभावित करीत होता. आतां तो वृद्ध ब्राह्मण निघून गेल्यावर त्या वृक्षाखाली नारायण एकटाच राहिला. त्या बाजूला कोणी फिरकत नव्हते. खेडे छोटे असल्यामुळे वर्दळ नव्हती. नारायणास त्या वृद्धाचे फार मोठे उपकार वाटले. तो जसजसा त्या उपकाराच्या आणि वृद्ध ब्राह्मणाच्या भेटी पासूनच्या घटनांचा क्रम आठवू लागला तसतसा त्याला तो एक चमत्कार वाटू लागला. भारावल्या सारखे आपण इथे आलो. त्या ब्राह्मणाने सांगितल्या प्रमाणे भिक्षा आणली. श्रीरामांना अर्पण केली. उर्वरित भिक्षा इथे घेऊन आलो. छान हाच कार्यक्रम आपण चालू ठेवू. इथे वर्दळ पण नाही. त्या वृद्धाने इथेच भिक्षा घेतली. कोण असावेत?

नारायण त्यांचा सात्विक चेहरा आठवण्याचा प्रयत्न करू लागला. तसतसा त्याला तो चेहरा तेज:पुंज रुपात अंत:चक्षु समोर ध्यानात दिसू लागला. साक्षात् श्रीराम! हो! आतां नारायणाचा स्वमनाशी संवाद सुरु झाला. आत्मारामच बोलू लागला. “अरे! तूं आणि मी ह्या भेदाचा त्याग कर. उद्या पासूनच पुरश्चरणकरण्यास सुरुवात कर. तुझे मन नि:शंक आहेच. पण ते पुरतेपणी अभेदमय झालेले नाही. ते होणे गरजेचे आहे. “ सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज |” हे गीतेतील वचन लक्षात ठेव. तसे झाले कीं तुझी तुलाच ओळख पटेल.” नारायणास अंतरल्या श्रीरामांकडून मार्गदर्शन होऊ लागले. दुसऱ्याच क्षणी त्याला त्या

ब्राह्मणाचा आशीर्वाद आठवला. “समर्थ व्हा! रामदास व्हा! ” छान हा आशीर्वाद म्हणजे आपल्यासाठी महान् वाक्य आहे.

रामाचा दास होण्याची खुणगाठ नारायणाने मनाशी निश्चित केली. त्यासाठी “ मी ” चा त्याग करायलाच हवा. माझे नाव नारायण! नारायण म्हटले कीं मला माझी जाणीव होते. नको. नारायण फक्त एकच तो जगन्नियंता “श्रीराम”! हा त्याचा दास! रामदास! दुसऱ्या दिवसापासून रामदासाची तपश्चर्या सुरूं झाली. पहाटे उठायचे. संगमावर स्नान करायचे. संध्या करावयाची. कमरे इतक्या पाण्यात उभे राहून पुरश्चरणास सुरुवात करावयाची. माध्यान्हा पर्यंत जप करीत उभे राहायचे. सूर्य मस्तकी आला कीं पंचवटीतून तीन घरी “ॐ भवति भिक्षांदेहि |” करायची. श्रीरामाला अर्पण करून उर्वरित “प्रसाद भिक्षा” आपण घ्यायची. असा नारायणाचा नित्यक्रम सुरु झाला. त्याचा नित्यक्रम पाहून मंदिरातल्या पुजाऱ्यांनी एकदिवस कौतुकाने विचारले, “नाव काय बाळ तुझे?” उत्तर आले “रामदास”!

रामदास मग झटपट निघत असे. जास्त संभाषण नको. ओळख द्यायची नाही. म्हणून होता होईतो रामदास सगळ्यांना टाळून टाकळी जवळच्या संगमी येत असे. पण अपवाद घडू लागले. मंदिरात ओळखी वाढू लागल्या. कुणा एका विद्वान् सात्विक गृहस्थाने या बालब्रह्मचारी रामदासावर मनापासून प्रेम करायला सुरुवात केली. त्याने रामदासाचा वक्तशीरपणा अनुभवला. त्याची ऋजुता लक्षात घेतली. त्याचा अलिप्तपणा पहिला. त्याची संभाषण कला व शास्त्राभ्यास विचारात घेतला. रामदासासाठी होता होईल ते तो करू लागला. प्रथम त्याने रामदासला पांढरी घोंगडी दिली. पांघरूण दिले. देहधारणे पुरते तरी वस्त्र हवे म्हणून

उपरणे, धोतर इत्यादी दिले. टाकळीच्या लोकांना आतां कुतूहल निर्माण झाले. हा बालयोगी राहातो कसा? करतो काय? ते दुरूनच पाहू लागले. भिक्षा प्रसाद झाल्यावर रामदास चिंतनात मग्न असत. दुपार टळल्यावर उन्हे उतरतीला लागली कीं श्रीराममंदिरात जाऊन बसत. शास्त्री, पुराणिकांच्या भेटी होत. त्यांना वंदन करून दुरून त्यांच्या चर्चा ऐकत. वर्ष-दीडवर्षाचा काल हा हा म्हणता निघून गेला.

रामदासाचे नाव जनस्थानात अनेकांना ठाऊक झाले. १५४४ मध्ये रामदासाची एका पुराणिकबुवांशी भेट झाली. त्यांनी आपल्या जवळची वाल्मिकी रामायणाची प्रत रामदासला भेट म्हणून दिली. रामदासांनी त्यावरून स्वत: मराठीत वाल्मिकी रामायण लिहिण्यास सुरुवात केली. ज्या वृक्षतळी रामदास रहात होते तिथे आता एक पर्णशाळा उभी केली होती. अनेक भाविक त्या काळात रामदासांची सेवा करू लागले होते. निंदक टवाळ्या करीत होते. रामदास अंतरातल्या आत्मारामाच्या बोधात मग्न होते. भाविकांनी जशी पर्णशाळा शाकारून दिली तशी वृक्षखाली दगड रचून सुंदर पारही बनवून दिला होता. रामदास त्या पारावर बसून दुपारचे वेळी चिंतनात मग्न होत असत. त्यांचे केस वाढले होते. त्यांचा आहार नियमित व ठरविक वेळीच होत होता. ते एकभुक्त झाले होते. साधना जोर धरीत होती. त्या साधनेचे तेज त्यांच्या शरीरावर दिसू लागले होते. चेहरा आधीच गोरा त्यात हे साधनेचे तेज. त्यामुळे रामदास अधिकच तेज:पुंज दिसू लागले. त्यांचे भव्य कपाळ, तेजस्वी टपोरे डोळे, तरतरीत नासिका, प्रेमळ नजर, शांत मुद्रा. त्यामुळे पाहताक्षणीच कोणीही त्यांच्याकडे आकर्षित होई. सात्विक वृत्तीच्या

लोकांना त्यांच्या दर्शनाचा छंद जडला. त्यांच्या पर्णशाळेत भाविकांची वर्दळ वाढू लागली. पंचक्रोशीत ते तपस्वी म्हणून मान्यता पावले.

शके १५४५ मधली एक दुपार होती. रामदास नित्याप्रमाणे ध्यानधारणेला वृक्षाखाली पारावर बसले होते. डोळे मिटलेले होते. कोणीतरी आल्याची चाहूल लागली. बरीच पावले स्तब्ध झाली. मग नमस्कार केल्याने कंकणांचा मंजुळ आवाज आला. ती दशपंचक गावच्या कुलकर्णी यांची तरुणवयात वैधव्य आलेली सून होती. पती निधनानंतर सती जाणार होती. सती जाण्यापूर्वी ह्या तपस्व्याचा आशीर्वाद घ्यावा म्हणून नमस्काराला आली होती. कंकणांचा आवाज ऐकून रामदासांनी “अष्टपुत्रा सौभाग्यवती भव” असा आशीर्वाद दिला. तो ऐकून सारेच चकित झाले. कुजबुज वाढली. ती स्त्री रामदासांना म्हणली, “महाराज आपला आशीर्वाद आता पुढल्या जन्मीच फळाला येणार नां?” रामदासांनी नेत्र उघडले. त्यांना सर्व हकीकत समजली. त्यांनी मनोमन श्रीरामाचा धावा केला. त्यांना अंतरातून प्रेरणा झाली. रामदासांनी तिच्या पतीस आणवले. स्वत:च्या कमंडलूतील गंगाजल त्याच्यावर शिंपडले. झोपेतून जागे व्हावे तसे जागे होऊन तो मुलगा उठून बसला. सर्वांनी जयजयकार केला, “समर्थ रामदासस्वामी महाराज की जय! ” रामदासांचा समर्थ म्हणून गौरव झाला. स्वामी म्हणून टाकळीच्या लोकांच्या मनात आदराचे स्थान मिळवले. त्याचवेळी रामदासस्वामींनी मनोमन ठरवले कोणीही नमस्कार करो आशीर्वाद फक्त एकाच “श्रीराम”!

टाकळी जवळच्या दशपंचक गावच्या कुलकर्ण्याचे भाग्य उजळले. त्या दंपतीने मनाशी निश्चय केला कीं पहिले अपत्य समर्थांच्या चरणी अर्पण करावयाचे. ज्यांच्यामुळे जीवदान मिळाले त्यांच्या कार्यास, त्यांच्या

सेवेत आपले अपत्य असावे. ह्या सद्भावनेने त्यांनी तसा संकल्प अपत्य होताच पूर्ण केला. सर्वांच्या साक्षीने अपत्याला घेऊन ते समर्थांच्या आश्रमात आले. अपत्याला समर्थांच्या चरणी अर्पण केले. समर्थांनी सर्वांना समजून सांगितले. ह्या बालकाला घेऊन मी काय करू? पण कुलकर्णी दंपती ऐकायला तयार नव्हती. म्हणाले, "महाराज याला आपल्या मांडीवर घ्या! आपले म्हणा! मग आपली ठेव म्हणून आम्ही याचा सांभाळ करू. सांगाल त्या क्षणी आपल्या चरणी आणून ठेवू. प्रभो नाही म्हणू नका! देवा एवढी विनंती मान्य करा." अंतरीची भावना जाणून समर्थांनी त्या बालकास आपल्या मांडीवर घेतले. त्याच्या मस्तकावर हात ठेवला. आशीर्वाद दिला "जय श्रीराम"! कुलकर्णी दंपती आनंदून गेली. वारंवार त्या बालकास आश्रमात आणू लागली. समर्थांचा सहवास त्याला घडू लागला. त्याचा व्रतबंध समर्थांच्या मांडीवरच झाला. समर्थांनी बालकाचे नाव उद्धव ठेवले होते. उद्धव समर्थांची सेवा मनापासून करीत असे. समर्थ म्हणजे त्याचे सर्वस्व झाले होते. आई-वडील तेच. साक्षात् परमेश्वरच. सर्व पंचक्रोशीत काय पण दूरवर समर्थांचा कीर्तीसुगंध पसरू लागला.

समर्थांची तपश्चर्या सुरु होऊन ९ वर्षांचा कालावधी होत आला होता. समर्थांच्या भेटीसाठी अनेक थोर राजकारणी दूरवरून येऊ लागले होते. त्याच सुमारास शके १५५१ मध्ये एक अपूर्व घटना घडली ती श्री शहाजीराजे भोसले यांची. त्याकाळी शहाजी राजे भोसले नाशिक त्र्यंबकेश्वर इत्य्यादी भागाचे सत्ताधीश होते. एवढी महान आसामी. पण समर्थांच्या भेटीसाठी टाकळीच्या आश्रमात आली. समर्थांच्या आश्रमात त्यांनी अत्यंत नम्रपणे पाऊल ठेवले. आश्रमातल्या वातावरणाने

शहाजीराजे भारावून गेले. त्यांना क्षणकाल स्वत:चा विसर पडला. त्यांनी एकांतात समर्थांचा आशीर्वाद घेतला. समर्थांची प्रार्थना केली. समर्थांना कृष्णातीरी मसुरीस येण्याची विनंती केली. समर्थ म्हणाले आपण श्रीरामाच्या आधीन आहोत. त्यांची प्रार्थना करा. सर्व ठीक होईल. योग्यवेळी येणे घडेल. कां कोणास ठाऊक पण शहाजीराजे भोसले अत्यंत भारावले. त्यांना काहीच बोलणे सुचेना. आपला एवढा मातब्बर धनी ह्या महाराजांच्या पुढे नतमस्तक होतोय हे पाहून त्यांचे कारभारी समर्थचरणी नतमस्तक झाले. भोसल्यांच्या घराण्यावर लक्ष ठेवण्याची विनंती करून शहाजीराजे समर्थांचा आशीर्वाद घेऊन निघाले.

शके १५५४ उजाडले. समर्थ आपल्या साधनेत तल्लीन होते. समर्थ पंच पंच उष:काली उठत असत. शौचाचमन करून दर्भासनावर कंबलासन त्यावर धूतवस्त्र घालून ते साधनेला बसत असत. त्यांची मनोभावे सेवा करणारा उद्धव समर्थचरणी खऱ्या अर्थाने लीन झालेला होता. कुलकर्णी दंपतीने आपल्या अपत्याला सद्भावाने समर्थ चरणी अर्पण केल्याचे सार्थक झाले होते. समर्थांनी त्याला आपले म्हटले होते. उद्धवाला समर्थांसारखी अलौकिक माता-पिता मिळाल्यावर लौकिकातल्या माता-पित्याचे आकर्षण कसे उरणार! उद्धव मनापासून व आत्मार्पित बुद्धीने समर्थांची सेवा करीत होता. समर्थ सांगतील ते प्रमाण मानून तसेच वागत होता. सदैव समर्थांच्या मागे मागे असे. आश्रमाची सर्व व्यवस्था सांभाळीत होता. पहाटे अंगण झाडण्यापासून ते फुलझाडांची निगा राखण्या पर्यंत सगळी कामे करीत असे. समर्थांना गंगेचे पाणी आवडायचे म्हणून एका छोट्या रांजणात रोज गंगेचे ताजे पाणी भरून ठेवायचा. त्यावर सुरेख हिरव्यागार पानांचे आच्छादन करायचा. कोण्या

एका भक्ताने समर्थांना पादुका दिल्या होत्या. त्या रोज पुसून समर्थ बाहेर निघाले कीं त्यांच्या पायात घालून द्यायचा. समर्थांना त्याचा आग्रह मोडवायचा नाही. उद्धवाला आनंद व्हावयाचा.

एक दिवस समर्थ नित्याप्रमाणे पहाटे उठले. त्यांच्या तपाचरणास आज १२ वर्षे पूर्ण झाली होती. पहाटेच्या मंदवाऱ्याच्या झुळुका आल्हाद देत होत्या. उद्धवाने समर्थांचे आसन तयार केले होते. समर्थ श्रीरामांचे ध्यान धरून बसले. क्षणात त्यांची समाधी लागली. साक्षात् प्रभुरामचंद्र त्यांच्या समोर उभे राहिले. समर्थांना सांगू लागले. “आज इथली तपश्चर्या पूर्ण झालेली आहे. आता इथून निघा. खूप मोठे कार्य करावयाचे आहे.” पंचवटीतल्या श्रीरामांच्या दर्शनाची संवय समर्थांना लागलेली होती. त्यांना तिथून निघावेसे वाटेना. म्हणून समर्थ म्हणले, “ अजून पुरश्चरण पूर्ण झालेले नाही! ” प्रभुरामचंद्र म्हणाले, “ते नंतरही पूर्ण करता येईल. आम्ही सदैव तुमच्या संनिधच असतो.” प्रभुरामचंद्रांच्या वाणीने व दर्शनाने सुखावलेले समर्थ श्रीरामांना विचारु लागले, “प्रभो! आपणच मला तपाला बसवले. अद्याप मला या विश्वाचे गूढ उकलेले नाही. देहाचे ममत्व आपल्या कृपेने सुटले असले तरी ह्या भावना कां राहाव्यात? मला निघण्यासाठी आपल्याला प्रकट होऊन मार्गदर्शन करावे लागत आहे नां? म्हणजे द्वैत आहेच. मग “मी”चा त्याग खऱ्या अर्थाने कुठे झाला आहे?” समर्थ असे म्हणताच तत्क्षणी प्रभू रामचंद्रांनी त्यांच्या मस्तकाला स्पर्श केला. आणि समर्थ एक अपूर्व अनुभूती घेऊ लागले. प्रभुरामचंद्रांसह संपूर्ण विश्व चक्राकार फिरू लागले, आणि एका स्थिर बिंदूत लोप पावू लागले. त्या बिंदूत फक्त प्रकाश होता. समर्थांना स्वत:चे शरीर भासेना. कसलीच जाणीव उरली नाही. तरी ‘अहं ब्रह्मास्मी’चे स्फुरण अंतरात स्फुरतच होते.

स्थळ काळाच्या अतीत होऊन जाणीवच विकार रूपाने विस्तारली असल्याचा प्रत्यय त्यांनी मन, बुद्धी, चित्त व अहंकार यांच्या अतीत होऊन निर्विकल्प अवस्थेत घेतला. उत्पत्ती, स्थिती व लय जाणीवेच्या विकारमय प्रकृतीची भावना आहे. सत्व, रज व तम अशा त्रिगुणात्मक प्रकृतीचे अवक्रांत स्वरूप आहे. मूळ “स्व”भाव हा सत्व,रज व तम यांच्या अतित आहे. जीवदशा अवक्रांत अवस्था आहे. मग तो ब्रह्मा विष्णु व महेश कां असेना. सत्व, रज व तम हे अनुक्रमे विष्णु, ब्रह्मा व महेश हे स्वत:च असल्याचे त्यांनी विश्वात्मक भावनेतून अवस्थेखेरीज अनुभवले. त्याचे वर्णन त्यांच्याच मुखातून बाहेर पडले. “ तेचि डोळियाचा डोळा पाही | देहातीत वर्म विदेही | चिन्मय सुखाची बवाई | भोगी आपुले की गा ||**|| अनुभवाची शीग भरली | अग्रपारी उसळली | भूमंडळी प्रभा पडली | कर्पूर नभ झाले ||**|| (संदर्भ:- समर्थकृत सोलीव सुख) सद्गुरुकृपेची केवढी ही थोरवी! समर्थ हा सर्व चमत्कार अनुभवीत होते. त्यांना चक्क त्या ठिकाणी ‘ स्व ‘ भावाचे एकरुपात्मक विश्व जाणवले. स्वत:मध्येच त्यांनी विष्णूंना प्रकट होताना पाहिले. त्यावेळी त्यांना एकच जाणवले “ शांती येऊनि माळ घाली | अलक्ष्य सेजे निजली | हंसपदे ऐक्य झाली | सुख सुखाते निमग्न ||**|| ”

समर्थ आत्मसुखातच निमग्न झाले. किती काल गेला ह्याची गणना कोण करणार? पण प्रभुरामचंद्रांनी त्यांना देहभानावर आणले. आत्मतत्त्वात राहून सांगू लागले, “ आता खात्री झाली कां तूं आणि मी वेगळा नाही. उठ जगदोद्धारासाठी तीर्थयात्रेला निघ. मी सदैव तुझ्या संनिधच असणार आहे.” समर्थांच्या जवळ बोलायला शब्दच उरले नव्हते. तरी त्यांनी आपली अनावर भावना शब्दबद्ध केलीच. श्रीरामांना ते म्हणू

लागले, “ प्रभो मी आपली स्तुती तरी काय करू? साक्षात् सद्गुरुरुपाने माझ्यातच वास्तव्य करणाऱ्या आपणास कोणत्या शब्दात वर्णू? आतां सद्गुरु वर्णवेना | जेथे माया स्पर्शो शकेना | ते स्वरूप मज अज्ञाना | काय काळे || जय जयाजी सद्गुरुराजा | विश्वंभरा विश्वबीजा | परमपुरुषा मोक्षध्वजा | दीन बंधु || तुझीयेन अभयकरे | अनावर हे माया ओसरे | जैसा सूर्यप्रकाशे अंधारे | पळोन जाये || मायेच्या बळे करीन स्तवन | ऐसे वांच्छित होते मन | माया जाली लज्जायमान | आतां काय करूं || होती स्तवनाची दुराशा | तुटला मायेचा भर्वसा | आतां असेल तैसे असा | सद्गुरु स्वामी || हरिहरब्रह्मादिक | नाश पावती सकळिक | सर्वदा अविनाश येक | सद्गुरुपद ||” समर्थ सद्गुरूंची स्तुती करीत होते. वाणी प्रकट झाली होती. उद्धव मंत्रमुग्ध होऊन ऐकत होता. समर्थ भक्तीच्या अत्युच्च शिखरावर गेलेले त्याने पाहिले. नतमस्तक होऊन उद्धव समर्थांना साष्टांग नमस्कार घालून तसाच राहिला.

समर्थ देहभानावर आले. त्यांनी उद्धवाला आपल्या हृदयाशी कवटाळले. आपण तीर्थयात्रेस निघणार असल्याचे सांगितले. लहानगा उद्धव समर्थांना बिलगला. आपण पण येणार म्हणू हट्ट धरून बसला. समर्थांनी त्याची समजूत घातली. त्याच्या मस्तकावर हात फिरवून म्हणाले, “ उद्धवा! इथे आश्रमाची व्यवस्था तुझ्या शिवाय कोण बघणार? सांग! मी लवकरच परत येईन.” पण उद्धवाची समजूत कशानेच पटेना. म्हणून समर्थांनी तिथेच गाईच्या शेणाचा एक सुरेख मारुती तयार करून दिला. त्याची रोज पूजा करीत जा म्हणून आज्ञा दिली. माझी आठवण येईल तेंव्हा या हनुमंता जवळ ये. तुला काही कमी पडणार नाही. उद्धवास समर्थांनीच आपले म्हटले होते. त्याला काय कमी पडणार होते.

समर्थांनी पंचवटीत जाऊन श्रीरामांचे दर्शन घेतले. वृत्ती मुळातच उदास होती. कुठल्याच उपाधीत अडकत नव्हते. प्रभुरामचंद्रांच्या आज्ञेप्रमाणे तीर्थयात्रेस निघायला समर्थांना कितीसा वेळ लागणार? गळ्यात एक झोळी अडकवून निघाले. काय होते त्या झोळीत? एक घोंगडी अंथरायला, एक वस्त्र पांघरायला, एक कफनी, एक कुबडी, एक रुद्राक्षाची माळ, एक कमंडलू. बाकी काय हवे? अंतरात सर्व विश्व समावून घेतलेले. त्यामुळे बाह्योपचार अगदी आवश्यक तेवढाच. लोकोपचारासाठी. स्वत:चा विचार कुठे? मोजक्या लोकांना व दशपंचक गावाच्या कुलकर्णी दंपतीला ही वार्ता समजली. त्यांच्या पोटात लक्क झाले. त्यांना रहावेना. त्यांनी धावत येऊन समर्थांना भावावेगाने साष्टांग लोटांगण घातले. कुलकर्णी दंपतीचे सांत्वन करून इतरांना आशीर्वाद देऊन समर्थ निघाले. सर्वांच्याच अंतरात शोक दाटला होता. लोक मागे मागे चालत होते. समर्थांना एकाएकी एक युक्ती सुचली. ते थोडे थांबले. झटकन मागे वळले. दोन्हीही भुजा उंचावल्या. आपल्या कणखर व खणखणीत आवाजात गर्जना केली.

**“जय जय रघुवीर समर्थ”**

त्या गर्जनेत जादू होती. सर्वांच्या अंतरात “रघुवीर” समर्थ असल्याची ज्योत उजळली. त्या गर्जनेचा नाद लोकंच्या शोकाचे समूळ उच्चाटन करून गेला. लोक श्रीरामाच्या त्रयोदशाक्षरी मंत्राच्या नामस्मरणात गुंग झाले. समर्थ पाठमोरे होऊन चालू लागले. लोकही नामस्मरणाचा घोष करीत त्यांच्या पाठोपाठ निघाले. तपोवन, पंचवटी ओलांडून श्रीसमर्थ त्र्यंबकेश्वरच्या मार्गावर आले. आलेल्या भक्तांना प्रेमाने आशीर्वाद देऊन परत पाठवले. आतां चालता बोलता “जय जय रघुवीर

समर्थ" चा निनाद संपूर्ण भारतभर घुमणार होता. ललकारणार होता. साकारणार होता. समर्थ त्र्यंबकेश्वर येथे आले. त्र्यंबकेश्वराचे दर्शन घेऊन गंगाद्वार करून ब्रह्मगिरीवर आले. प्रदक्षिणा करून पुढे निघाले.

समर्थरामदासस्वामी झपाट्याने पुढे सरकत होते. चालण्याचे परिश्रम होत होते. पण श्रीरामाच्या स्मरणात पृथ्वी प्रदक्षिणा सुरु होती. वाटेतील प्रत्येक तीर्थात स्नान करीत करीत समर्थ श्रीक्षेत्र काशी येथे आले. काखेतली झोळी ठिकठिकाणच्या तीर्थात धुतल्या मुळे मातकट झालेली! कफनी पण तशीच. त्यामुळे वस्त्रे मलीन दिसत होती. जटा-दाढी वाढलेली. जटा दाढीच्या अस्ताव्यस्तते मुळे उंचेपुरे, भव्य कपाळाचे, धारदार नाकाचे, तेजस्वी डोळ्याचे समर्थ उग्र दिसू लागले होते. त्यांनी प्रथम मनकर्णिका तीर्थावर स्नान केले. मग मोदादि पंच विनायकाचे दर्शन घेतले, नंतर पांचाळेश्वराचे दर्शन घेऊन कालभैरवाचे दर्शन घेतले. आणि आता काशिविश्वेश्वराचे दर्शन घेण्यास काशिविश्वेश्वराचे मंदिरात आले.

समर्थ दर्शनासाठी गाभाऱ्यात जाऊ लागताच द्वाराशी उभ्या असलेल्या ब्राह्मणांनी त्यांना आत जांण्यास मज्जाव केला. सारेच अनपेक्षित होते. पण घडले होते. त्या ब्राह्मणांना काय शंका आली कोणास ठाऊक! पण ते बाहेरूनच दर्शन घ्या असे म्हणू लागले. त्यांना ठीक आहे असे म्हणून समर्थरामदासस्वामी बाहेरच मंडपांत बसले. इतक्यात गाभाऱ्यात काशिविश्वेश्वरावर अभिषेक करणाऱ्या ब्राह्मणांना एकाएकीं लिंग दिसेनासे झाले. लिंग दिसेना म्हणून ते सगळेच ब्राह्मण अस्वस्थ झाले. बोभाटा झाला. बाहेरचे ब्राह्मण आत गेले. त्यांनाही दर्शन होईना. ब्राह्मण सूज्ञ होते. त्यांच्या लक्षात आले. ह्या कोणत्यातरी नवीन आलेल्या स्वामींना आत प्रवेश दिला नाही म्हणून देव रागावले असावेत. त्या

ब्राह्मणांनी त्वरित साष्टांग दंडवत घालून समर्थांची क्षमा मागितली. त्यांना सन्मानाने आंत नेले. लिंग पूर्ववत् दिसू लागले.

समर्थरामदासस्वामींच्या सामर्थ्याचा त्या सर्वांना प्रत्यय आला. समर्थ गाभाऱ्यातून बाहेर पडतांच त्या ब्राह्मणांनी समर्थांना पुन्हा साष्टांग दंडवत घालून मन:पूर्वक क्षमा मागितली. समर्थांनी “जय जय रघुवीर समर्थचा” घोष काशीनगरीत घुमविला. पंचक्रोशी व पंचतीर्थी यात्रा त्या घोषात पूर्ण केली. विश्रांती साठी हनुमानघाटावर आले. हनुमान घाटावर हनुमंताचे मंदिर नव्हते. समर्थांनी तिथे एक सुंदर हनुमान मंदिर स्थापन केले.

समर्थांना लोक शरण येत होते. त्यांच्या बरोबर यात्रा करू लागले होते. समर्थांचा सहवास लोकांना हवा हवासा वाटत होता. लोकांमध्ये आपुलकी निर्माण करीत होता. लोकांना सुखावत होता. समर्थ आता अयोध्येकडे निघाले. जय जय रघुवीरसमर्थच्या स्मरणात त्यांना अयोध्येची ओढ निर्माण झाली. त्यांची चालण्याची गती वाढू लागली. आयोध्या जसजशी जवळ येऊ लागली तसतशी समर्थांची भावना तरल होऊ लागली. समर्थांना श्रीराम भेटीची इतकी ओढ निर्माण झाली कीं त्यांच्या बरोबरच्या लोकांना त्यांच्या बरोबर चालणे मुश्कील होऊ लागले. समर्थांना श्रीराम जन्मस्थान मंदिराचा कळस लांबून दिसता क्षणीच समर्थांनी साष्टांग दंडवत घातले. कधी त्या पवित्र स्थानावर मस्तक ठेवतो, असे त्यांना होऊन गेले. गेल्या तेवीस पिढ्या त्यांच्या घरांत श्रीरामांची उपासना होती. पिढ्यान्पिढ्या चालत आलेली भक्ति निर्विकल्पातून पण समर्थांच्या मुखाने ‘रामनामाच्या’ घोषातून स्त्रवत होती. बरोबर असलेले

लोक मंत्रमुग्ध होऊन ते नामामृत श्रवण करीत होते. एकासुरात साथ देत होते.

समर्थांनी मंदिरात प्रवेश करण्यापूर्वी शरयू नदीत स्नान केले. आपला कमंडलू भरून घेतला. झपझप पावले टाकीत ते मंदिरात आले. त्या क्षणी समर्थांचा भाव एवढा उत्कट झाला कीं त्यांचे अष्टसात्विक भाव जागे झाले. आनंदाश्रूंनी नयन पाझरू लागले. अंगावर रोमांच उभे राहिले. कंठ सद्गदित झाला. अंगाला कंप सुटला. घाम आला. विवर्ण झाले. साष्टांग दंडवत घालून ते तटस्थतेने समाधी सुख अनुभवू लागले. त्यांच्या ह्या अवस्थेचे वर्णन त्यांच्या सहवासात असलेल्या मेरूस्वामींनी ते अनुपम चित्र शब्दबद्ध केले. " स्वानन्दाश्रूंनी पाझरती नयन | सप्रेमयुक्त प्रतीतीने पूर्ण | थरकती रोमांच चमत्करोन | कांपती गदगदा || स्तब्ध अंत:करण स्तंभीभूत | पराकाष्ठा निश्चेष्टीत | लोटांगणी पडती भूमीवरी ||" तेथील सर्व वातावरण भक्तिरसाने भरून गेले. दर्शनाला येणारा प्रत्येकजण भारावला जात होता. त्यालाही समर्थांची स्पन्दने राममय करून टाकीत होती.

समर्थ अयोध्येत रमले. अहोरात्र नामघोष चालू होता. समर्थ स्वत:च्या कसदार व कणखर आवाजात अभंग संकीर्तनाने मंदिर दुमदुमवून टाकू लागले. समर्थांच्या आवाजातील श्रीरामचरित्र ऐकताना श्रोते देहभान हरपून जात असत. समर्थ श्रीरामचरित्राशी एकरूप होऊन त्या त्या घटना वर्णन करू लागले कीं लोकांच्या समोर ते चित्र प्रत्यक्ष उभे राहत असे. समर्थांची ही तन्मयता सर्वांनाच मुग्ध करावयाची. मेरूस्वामींनी त्याचे वर्णन केले. "रामस्मरणे आकाश फुटे | नीरावकाश अनुसंधान प्रकटे | अमरवृंद पाहो लोटे | सुमनवृष्टी तोषे ||" अहाहा काय अनुपम सोहळा होता. अहो साक्षात् देवेंद्र एकटा नव्हे तर देवगणांसह ते

नामस्मरण ऐकावयास येत होता. सर्वांनाच वेड लागले होते समर्थांचे! सोहळा कितीही अपूर्व असला तरी काल मर्यादा येतेच. श्रीरामांनीच आज्ञा दिली आतां इथून निघा. खूप काही कार्य बाकी आहे. आधी सर्व यात्रा पूर्ण करा. समर्थ श्रीरामांच्या आज्ञेने भावविवश होऊन निघाले.

समर्थांना आता बरेच शिष्य झाले होते. अनेकजण समर्थांच्या आज्ञेची वाट पहात. जें समर्थांना अंतर्बाह्य शरण गेले होते अशांना समर्थ हेरून ठेवीत असत. समर्थ सर्व शिष्यपरिवारासह गोकुळांत आले. मग वृंदावन, मथुरा, विन्दार्क, प्रभास इत्यादी तीर्थे करीत होते. प्रत्येक ठिकाणी समर्थांना अनेक लोक शरण येत होते. शिष्य परिवार वाढत होता. त्यामुळे समर्थांना मठ स्थापन करणे गरजेचे झाले. म्हणून जिथे जिथे शक्य होते तिथे मठ उभारायला सुरुवात केली. प्रभुरामचंद्रांच्या पूजेची, नैवेद्याची व्यवस्था करून द्यावी. आपल्या शिष्यांपैकी योग्य शिष्याला तिथे मठपती नेमावे. असा क्रम सुरु झाला. प्रत्येक शिष्याला " पाचवी भक्ति ते अर्चन | अर्चन म्हणजे देवतार्चन | शास्त्रोक्त पूजाविधान | केले पाहिजे || काया वाचा मने | चित्त वित्त जीवे प्राणे | सद्भावे भगवंत अर्चने | या नाव अर्चना भक्ति ||" ही शिकवण दिली होती, आणि शिष्य त्या भावनेने रहात असत. श्रीरामांचे अर्चन करीत. समर्थ सांप्रदाय वाढवीत भक्तिरसात डुंबत असत. सकाळ संध्याकाळ "जय जय रघुवीर समर्थचा" घोष निनादवीत!

समर्थ सर्व शिष्यांसह द्वारकेस आले. भक्तिभावाने भगवान श्रीकृष्णांचे दर्शन घेतले. द्वारकेत भगवान श्रीकृष्णांच्या साक्षीने समर्थांनी श्रीराममंदिर स्थापन केले. आपल्या शिष्यांपैकी काहींना तिथे ठेवले. श्रीरामाच्या पूजा नैवेद्याची व्यवस्था करून दिली. "महंते महंत करावे |

युक्तीबुद्धीने भरावे | जाणते करून विवरावे | नाना देसी || ” ह्या समर्थांच्या बाण्याप्रमाणे “ समर्थ सांप्रदायाची ” वाढ होऊ लागली.

समर्थ काश्मीरला निघाले. त्यावेळी उत्तरेकडे शहाजहानची राजवट होती. मुस्लिमांचा पाशवी अत्याचार समर्थांना ह्या पर्यटनांत दिसत होता. अशा प्रतिकूल वातावरणात श्रीसमर्थ रामदासस्वामी अनेक शिष्यपरिवारासह अत्यंत निर्भयपणे प्रवास करीत होते. इतकेच नव्हे तर ठिकठिकाणी श्रीराम मंदिरांची स्थापना करीत होते. श्रीहनुमानमंदिरे स्थापन करीत होते. समर्थ संप्रदायांचे मठ स्थापन करीत होते. ठायी ठायी हरिनामाचा गजर चालू करून देत होते. त्याची व्यवस्थाही करून देत होते. कोणापुढे हात पसरून नव्हे तर जनता जनार्दनाने स्वेच्छेने दिलेल्या द्रव्यातून हे सर्व होत होते. समर्थांची झोळी सतत भरत होती आणि ते ती अशा प्रकारे रिकामी करीत होते. त्या काळात मुस्लीम व मुघलसाम्राज्य वैदिक परंपरा नष्ट करण्यात धन्यता मानीत होते. अशा काळात श्रीसमर्थांनी सहजपणे धर्म जागृती केली. मोगलांच्या अत्याचारांमुळे हीन दीन झालेल्या अनेक निष्ठावंत वैदिकांच्या अंत:करणात “जय जय रघुवीर समर्थ” च्या घोषामुळे नवचैतन्य निर्माण झाले. वीरश्रीसह पुनश्च वैदिक निष्ठा प्रज्वलित होऊ लागली. समर्थ मुमुक्षूंना साधक करीत होते. साधकांना सिद्ध करीत होते. सिद्धांना आत्मप्रत्ययाची अनुभूती देत होते. देहात राहून विदेही कसे होता येते याचा प्रत्यय देत होते. त्यात भेदभाव नव्हता. सर्वात्मकता होती. समभाव होता.

समर्थ रामदास स्वामीमहाराज श्रीनगर येथे आले. सर्व शिष्यांसह काही काल तिथे वास्तव्य केले. तिथे एक शीख पंथाचा अतिशय उच्च

अवस्थेप्रत पोहोचलेला नानकपंथी धर्मगुरू म्हणा किंवा नानकपंथी शीखसांप्रदायाचा अधिकारी म्हणा रहात होता. शिखांचा संप्रदाय धर्मगुरु " नानक " यांचेपासून इ.स.१४९९ च्या सुमारास सुरु झाला होता. नानक यांनी सर्व धर्मातील उच्च जीवनमुल्ये जोपासून ग्रंथसाहिबची स्थापना केली. ग्रंथसाहिबची अनेक पारायणे करूनही ह्या अधिकारी शीख गृहस्थास आत्मानात्मविवेकाचा काही उलगडा होत नव्हता. त्यामुळे श्रीनगरला तो आश्रमीय जीवन जगत होता. येणाऱ्या जाणाऱ्या संतांना आत्मानात्मविवेकाबद्दल अनेक प्रश्न विचारून स्वत:चे समाधान करून घेण्याचा प्रयत्न करीत होता. पण त्याच्या मनाचे काही समाधान होत नव्हते. तरीपण प्रत्येक साधूला तो अत्यंत विनयाने नमस्कार करून सन्मानित करून बोळवत असे.

योगायोगाने त्या धर्मगुरूची व समर्थांची श्रीनगरमध्ये भेट झाली. त्याने अत्यंत भक्तिभावाने समर्थ रामदास स्वामींना नमस्कार केला. समर्थांशी थोडे बोलल्यावर त्याचे अष्टसात्विक भाव जागे झाले. त्याला आत्मानात्मविवेकाचा मोठाच प्रश्न पडला होता. त्यमुळे नुसत्या शब्दपांडित्या पेक्षा वेगळे काही मिळाले तर पाहावे ह्या प्रामाणिक व शुध्द भावनेतून त्या नानकपंथी साधकाने समर्थांना सांगितले कीं, मी वैदिक परंपरेचा अभ्यास केला आहे. गुरुनानक यांच्या तत्त्वांच्या सहाय्याने अनेक ग्रंथाचे वाचन केले आहे. पण काही प्रश्न अनुत्तरीत राहिले आहेत.वेद व स्मृती ह्यांच्यात एकवाक्यता आढळून येत नाही. विविध प्रकारे त्यांत मंडण व नंतर खंडण केलेले आढळते. प्रत्येक मुनी वेगळी मतप्रणाली व्यक्त करतो. काही ऋषी २६ तत्त्वे सांगतात तर काही २५, ७, किंवा ४, ९, १७, १३, इतकी सांगतात. तर या गोंधळात टाकणाऱ्या विविधतेचे कारण

काय? तरी कृपया मला हे समजून सांगा कीं धर्मतत्त्व व परमेश्वर म्हणजे नक्की काय?

समर्थ श्रीरामदासस्वामींनी त्याची अध्यात्माची खरी तळमळ जाणून घेतली, आणि समर्थ म्हणाले बाबारे तूं म्हणतोस ते अगदी खरे आहे. " येक तप सांगती | येक अजपा निरूपिती | येक तत्त्वे विस्तारिती | तत्त्वज्ञानी ||**|| येक सांगती सगुण | येक निरूपिती निर्गुण | येक उपदेसिती तीर्थाटन | फिरावे म्हणून ||**|| येक महावाक्ये सांगती | येक मुक्तीमार्ग प्रतिष्ठिती | येक इंद्रिये पूजन करविती | येकाभावे ||**|| नाना शास्त्रे धांडोळिता | आयुष्य पुरेना सर्वथा | अंतरी संशयाची व्यथा | वाढोची लागे ||**|| समर्थ त्याला सांगू लागले, बाबारे! वेद, स्मृती, शास्त्र हे सगळे तर्काच्या पलीकडले आहे. ते बुद्धीने अभ्यासता येते पण अनुभूतीने जाणता येत नाही. त्यासाठी " कर्तृत्व वेगळे करावे | मग त्या देवास पाहावे | तरीच काही एक पडे ठावे | गोप्य गुह्य ||**|| समर्थ सांगत होते तो शीख गृहस्थ मनापासून ऐकत होता. समर्थ पुढे म्हणाले, अरे, तुझ्या प्रश्नांची उत्तरे तुझ्यातच आहेत. परब्रह्म वेगळे नाही. परब्रह्म अखंड आहे. त्यासाठी ज्ञान प्राप्ती महत्वाची आहे. " ऐक ज्ञानाचे लक्षण | ज्ञान म्हणजे आत्मज्ञान | पाहावे आपणास आपण | यां नाव ज्ञान ||**|| पण हे ज्ञान तुला मनाचा अतिक्रम केल्याशिवाय होणार नाही. कारण ते " मन बुद्धी अगोचर | न चले तर्काचा विचार | उल्लेख परेहून पर | या नाव ज्ञान ||**|| " असे आहे. अरे मनाच्या पलीकडे बुद्धी व बुद्धीच्या पलीकडे आत्मतत्त्व. भगवंताने अर्जुनाला हेच सांगितले आहे " इंद्रियांणि पराण्याहुरिन्द्रीयेभ्य: परं मन: | मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु स: || " त्यामुळे धर्मतत्त्व हे आत्मतत्त्वा खेरीज अभ्यासताच येत नाही. म्हणून हे लक्षात घे कीं "शास्त्री बोलिला संकेत | पूर्वपक्ष आणि सिद्धांत | त्याचा होये

निश्चितार्थ | साधुमुखे ||**||  वेदशास्त्र श्रुतिस्मृति | तेथे वाक्यभेद पडती | ते सर्वही निवडती | सद्गुरु वचने ||**||  समर्थांच्या प्रत्येक शब्दावर त्या नानकपंथी धर्मगुरूचा विश्वास बसत होता. कारण ते निरूपणाचे बोल अनुभूतीच्या अमृतात भिजवलेले होते. त्यांत अध्यात्म हे संस्कृता प्रमाणे खोल भरलेले होते. समर्थ सांगत होते. ऋषींच्या मतभिन्नते बद्दल तूं जें म्हणालास ते अगदी खरे आहे. त्याचे कारण असे आहे कीं “ मनाच्या अनंत वृत्ति | जाणणे तेचि आत्मस्थिती | त्रैलोकी जितुक्या व्यक्ती | तदांतरी आत्मा ||**||” त्यामुळेच तर “ नाना मते नाना भेद | नाना संवाद वेवाद | नाना निश्चय भेदाभेद | आत्माच करी ||**|| मुख्य तत्त्व विस्तारले | तेणे तयास रूप आणिले | येणे करिता सार्थक झाले | सकळ काही ||**||” म्हणून प्रत्येक मुनी भिन्न मतप्रणाली व्यक्त करतो. कारण मत व्यक्त करताना शब्दबध्द करून सांगावे लागते, ते मनाच्या सहाय्याने. मन आणि बुद्धी यांच्या अतित असलेल्या तत्त्वाला शब्द असत नाहीत. शब्द हे मायेचे रूप आहे, बोलणे हेही मायेचे रूप आहे, म्हणून “ मायेमध्ये बोलणे चालणे साचे | माया नसता बोलणे कैचे | या कारणे नि:शब्दाचे | मूळ शोधावे ||*||” हे निरुपण ऐकता ऐकताच त्या शीख धर्मगुरूची समाधी लागली. त्याला आत्मतत्त्वाचा बोध नि:शब्द अवस्थेत झाला. आत्म्मानात्म विवेक वैराग्यासह प्रचीतीस आला. तो क्षणातच अंतर्मुख झाला. त्याच आत्मतत्त्वात त्याला आत्मसाक्षात्काराची अनुभूती आली. दिव्यत्वाची प्रचीती ज्यांच्यामुळे आली त्या समर्थांना साष्टांग नमस्कार करून त्या शीखधर्मगुरूने समर्थांचा अनुग्रह मागितला.

समर्थांनी त्याला खूप समजावून सांगितले. पण देहभानावर आलेल्या त्या धर्मगुरूला समर्थांच्याखेरीज दुसरा काही विचारच सुचेना. शेवटी समर्थांनी त्याला त्याच्या शीखधर्माची जाणीव दिली. पण तो इतका समर्थमय

झाला होता कीं तो समर्थांना म्हणाला. “ हे प्रभो जे शिकायचे म्हणून “ शीख ” झालो ते तर मी आपल्याकडून शिकलो. मग खरा “ सीख ” झाल्यावर आपण अनुग्रह केल्याने काय फरक पडणार आहे? आतां हा आपलाच दास आहे व पुढेही राहणार! ” समर्थांनी त्याला अनुग्रह दिला.

समर्थ रामदासस्वामींच्या वास्तव्याने उत्तरभारत पुनीत होत होता. वैदिक जीवनावरील श्रद्धा वाढत होती. समर्थ श्रीनगरहून बदरीकेदार व बद्रीनाथ करून एकटेच एका अज्ञात पर्वतावर गेले. हिमालयात सहसा जिथे मनुष्याचा वावर नसतो अशा एका पर्वतावर श्रीहनुमंताचे वास्तव्य आहे. त्याठिकाणी समर्थ एकटेच गेले. सर्व शिष्यपरिवार त्यांनी खालीच ठेवला. समर्थ श्रीश्वेतहनुमंताला भेटले. त्या भेटीत हनुमंतांनी समर्थांना टोप, मेखला, वल्कले, हुर्मुजी रंगाचे वस्त्र, जपाची माळ, पादुका व कुबडी आपला आशीर्वाद म्हणून दिले. हिमालयातल्या थंडीत समर्थांना ती वल्कले व वस्त्र फार उपयोगी पडले. त्यांना मोठाच आनंद झाला.

समर्थ हनुमंताची आज्ञा घेऊन पूर्वेला निघाले. चित्रकूट पर्वतादी करून रामटेक इत्यादी करीत करीत रामेश्वराकडे निघाले. यात्रा करीत करीत समर्थ रामेश्वरला आले. रामेश्वराचे दर्शन घेऊन समर्थ सेतुबंधावर असलेल्या हनुमान मंदिरात आले. हनुमंताचे दर्शन घेऊन तिथेच बसले. मनातल्या मनात हनुमंताची प्रार्थना केली. हनुमंत प्रकट झाले. समर्थांनी त्याना आपला परत जाण्याचा मनोदय सांगितला. त्यावेळी हनुमंत समर्थांना म्हणाले, “ मागे पंचवटीत असताना मी तुमचे पुराण श्रवण केले होते. तेंव्हा तुम्ही रावणाच्या बागेत पांढऱ्या कण्हेरीची फुले असल्याचे वर्णन केले होते. त्यावेळी मी काही बोललो नाही. पण आतां मी तुम्हाला सांगतो कीं ती लाल कण्हेरी होती, आणि खोटे वाटत असेल तर चला. आपण लंकेला जाऊन प्रत्यक्ष पाहून

येऊ. मी तुम्हाला वायूवेगाने लंकेत नेतो, असे म्हणून समर्थांना आपल्या खांद्यावर बसवून हनुमंताने लंकेकडे उड्डाण केले. द्वारपालाने हे वर्तमान त्वरित बिभीषणाला कळवले. बिभीषणाने त्वरित राजमंदिराच्या प्रवेशद्वारी येऊन त्यांचे स्वागत केले. आगतस्वागत झाल्यावर हनुमंतांनी समर्थांसह त्या राजप्रासादाच्या प्रांगणात भ्रमण केले. सर्वत्र विविध प्रकारची पांढरी फुले पाहून हनुमंत चकित झाले. नावालासुध्दा कुठे लाल कण्हेरी दिसेना.

सर्वत्र पांढऱ्याशुभ्र फुलांच्याभाराने कण्हेर नतमस्तक झालेली दिसत होती. हनुमंतांना आश्चर्य वाटले. त्यांनी बिभीषणाला विचारले, फुलझाडे बदललीस कां? बिभीषण म्हणाला प्रभो! हा तर प्रभुरामचंद्राचा अनुग्रह आहे. त्यामुळे इथल्या मूळ स्थितीत कोणतेच स्थित्यंतर मी केलेले नाही. सर्व त्यावेळेपासून आहे तसेच जतन केले आहे. हनुमंतांना आनंद झाला. मग त्यांनी समर्थांना विचारले कीं, इथे न येता न पहाता पांढरी फुले असल्याचे वर्णन आपण कसें केलेत? समर्थ म्हणाले, “प्रभो आपण माझी परीक्षा घेत आहात. अहो रावण हा शिवभक्त होता. त्यामुळे शिवापूजनासाठी त्याने पांढरीफुलेच लावली असणार. म्हणून मी पांढरी म्हणालो.” आपण लाल म्हणता कारण त्यावेळी आपण श्रीरामांचे दूत म्हणून सीतामाईचा शोध करण्यासाठी आला होता. आपण त्यावेळी रावणावर अत्यंत क्रुध्द झाल्यामुळे आपल्या डोळ्यात रक्त उतरले होते. त्या रक्तामुळे आपणास सगळीकडे लालफुले दिसली. तरी मला क्षमा असावी. कारण मी पांढरी फुले म्हणलो.

हे उत्तर ऐकून हनुमंत एकदम खुश झाले. प्रभुरामचंद्रांच्या स्मरणात त्यांनी समर्थांना आपल्या हृदयाशी कवटाळले. ती अपूर्व भेट बिभीषण पहात

होते. त्यांना समजावे, म्हणून समर्थांनी सर्व हकीकत सांगून काही अभंग म्हटले,

धन्य हे नगर धन्य बिभीषण | धन्य वरदान समर्थांचे ||१||
समर्थांच्या कृपे वर हा लाधला | चिरंजीव झाला कल्प एक ||२||
राघवाच्या कृपे भेटी याची झाली | लंकादेवी आली भेटी लागी ||3||
भेटीचा हा लाभ मारुतीच्या संगे | पुष्पाचिया योगे लाभ झाला ||४||

सर्वांनाच मोठा आनंद झाला. बिभीषणाच्या आग्रहावरून समर्थांनी लंकेतही प्रवचन कीर्तन करून रघुवीरांच्या नामघोषाने सर्व लंका दणाणून सोडली.

पुनश्च आकाशमार्गाने हनुमंताने समर्थांना परत सेतूरामेश्वरी आणून सोडले. तेथून हनुमंताची आज्ञा घेऊन समर्थ आपल्या शिष्यांसह हंसक्षेत्र, श्रीव्यंकटेश, पक्षितीर्थ, पंचमहालिंग, इत्यादी करून, किष्किंधा नगरीस आले. पंपासरोवर, ऋष्यमूक पर्वत इत्यादी श्रीरामांच्या पदस्पर्शाने पवित्र झालेल्या तीर्थांना वंदन करीत महाराष्ट्रातल्या दक्षिणकाशीस म्हणजे कोल्हापूरास आले. कोल्हापूरहून इतर तीर्थे करीत करीत समर्थ महाबळेश्वर, मग भीमाशंकर करून परत त्र्यंबकेश्वर येथे आले. त्र्यंबकेश्वरहून परत पंचवटीला आले. बरोबर बारा वर्षांनी समर्थ परत पंचवटीस आले होते. त्यांनी प्रथम राममंदिरात जाऊन तीर्थयात्रेचे सर्व फळ हातात उदक घेऊन " तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु " ह्या भावनेने विवेकयुक्त वैराग्यासह प्रभुरामचंद्रांच्या चरणी अर्पण केले. तत्क्षणी प्रभुरामचंद्रांनी हात पुढे करून ते उदक स्वीकारले. समर्थ धन्य झाले. आपल्या दासावर निजनिष्ठा प्रेम करणाऱ्या स्वामींना आनंद झाला. प्रभुरामचंद्रांनी समर्थांना कृष्णातीरी जाण्याची आज्ञा दिली. समर्थांनी आपल्या मातोश्रींचे दर्शन घेऊन जातो असे सांगितले. श्रींनी तथास्तु म्हणून आशीर्वाद दिला. आशीर्वाद घेऊन समर्थ टाकळीस परत

आले. उद्धव त्यांच्या चरणावर नतमस्तक झाला. समर्थांच्या चरणावर अश्रूंचा अभिषेक केला. त्याचा आनंद गगनात मावेना. उद्धव समर्थमय झाला.

समर्थ काही दिवस टाकळीस राहिले, आणि एक दिवस उद्धवास त्यांनी सांगितले कीं, “मी आतां कृष्णातीरी जाणार आहे. त्यामुळे सध्या अजून काही दिवस तूं इथेच राहा. मी कृष्णातीरी गेल्यावर तुला तिकडे येता येईल.”

गंगा प्रदक्षिणा करून समर्थ पैठणला येऊन पोहोचले. कीर्तन हा समर्थांचा आवडीचा विषय. ते श्रीनाथमहाराजांचे समाधीसमोर कीर्तन करीत. प्रचंड जनसमुदाय लोटत असे. प्रत्यक्ष नाथमहाराज प्रकट झाल्याचा लोकांना भास होई. तरीही काही अति चिकित्सक शास्त्री मंडळी काहीतरी कुरापती काढण्याचा प्रयत्न करीत.

ती संधी त्यांना एक दिवस मिळाली. समर्थांच्या पोषाखावरून त्यांनी कुरापत काढलीच. समर्थ गंगेवरून स्नान करून येत होते. त्यावेळी ह्या ब्रह्मवृंदाने त्यांना गाठले. त्यातल्या एकाने त्यांना विचारले. आपण भगवीवस्त्रे धारण करता आणि ही बेचकी जवळ बाळगता. काही अभ्यास आहे कां? असेल तर आकाशातल्या उडत्या पक्षाला नेम लावून दाखवा. समर्थ म्हणाले, ”आपण क्षेत्रस्थ ब्राह्मण. साक्षात् भूदेव! आपला शब्द मी कसा मोडू?” असे म्हणून समर्थांनी एक खडा घेतला. बेचकीत धरला, आणि नेम धरून एका उडत्या घारीवर सोडला. घार घायाळ झाली. त्या ब्रह्मणांना चांगलेच फावले. ते म्हणाले, “अहो गोसाविबुवा हे तर महापाप झाले! आपण भगवद्भक्तीवर बोलता, कीर्तन करता आणि पक्षी मारता! हे तर फार वाईट. आतां आपल्याला प्रायश्चित्त घ्यावे लागणार.”

त्या ब्राह्मणांच्या मनात असे होतेच कीं ह्याने दाढी केस वाढवलेले आहेत. त्यामुळे याचे व्यक्तिमत्व साधूसारखे दिसते आहे. लोकांना समजत

नाही. ते भुलतात. आतां याच्या दाढी-मिशा गेल्या क्षौर करावे लागले म्हणजे आपोआपच याचे महत्व कमी होईल. समर्थांनी लगेच प्रायश्चित्त घेण्याची तयारी दर्शवली. त्या ब्राह्मणांनी विधिपूर्वक प्रायश्चित्त दिले. प्रथम क्षौर करून जटादाढी काढल्या. मग सगळे स्नानविधी झाले. प्रायश्चित्तादिक कर्मे यथासांग झाली. समर्थांनी त्या ब्रह्मवृंदाला साष्टांगनमस्कार घातला. आणि समर्थांनी विचारले," भूदेव हो! मी प्रायश्चित्त घेऊन शुध्द झालो आहे कां?" ब्रह्मवृंदाने "हो" म्हणून उत्तर दिले. समर्थांनी विचारले, "मग प्रायश्चित्त घेतल्याचे फळ काय? गतप्राण झालेली घार तर तशीच आहे! " ब्रह्मवृंद हसला! त्यातलाच एक हुशार व स्वत:ला फार शहाणा समजणार पुढे झाला आणि म्हणाला, "शास्त्राधारे कर्म करणे आमच्या हातात आहे. फळ मिळणे प्रायश्चित्त घेणाऱ्याच्या श्रद्धेवर अवलंबून असते." समर्थांनी त्यांना परत साष्टांग नमस्कार केला. आणि म्हणाले, "आपण साक्षात् भूदेव आहात. आपण मला पावन केले आहे. त्यामुळे मी निष्पाप झालो आहे. म्हणून हे सर्व साक्षी प्रभो जर माझे अंत:कारण शुद्ध असेल तर सर्व परिस्थिती पुर्ववत् होवो."

असे म्हणता क्षणीच घार आकाशात झेपावली. समर्थांच्या जटादाढी पुन्हा पूर्ववत् दिसू लागल्या. आतां मात्र ब्राह्मण आश्चर्य चकित झाले. त्यांनी समर्थांना साष्टांग नमस्कार घातला, समर्थांनी प्रतीनमस्कार केला, ब्राह्मणांनी समर्थांना विनयाने विचारले हे कसें घडले? समर्थ म्हणाले, "तुमच्या शास्त्रावरील निष्ठेचा हा परिणाम आहे, तुमच्या आचारसंपन्नतेत असलेले सूप्त सामर्थ्य माझ्यातल्या श्रद्धेने फलद्रूप झाले आहे." समर्थांचे सामर्थ्य लक्षात घेऊन ते सर्व समर्थांना शरण गेले. समर्थांचा अनुग्रह घेऊन पुनीत झाले.

समर्थ पैठणहून आपल्या जन्मगावी जांबवती नगरीस आले. प्रथम श्रीराम मंदिरात गेले. श्रीरामदर्शन घेऊन हनुमान मंदिरात आले. हनुमंताचे दर्शन घेऊन आपल्या घरी आले. आंगणात प्रवेश करून कसदार आवाजात “ जय जय रघुवीरसमर्थ ” असा घोष केला. तो आवाज समोरच्या ओसरीला पार करून खोल्या खोल्यांमध्ये घुमला आणि थेट परसदारा पर्यंत गेला. घरातील काम करीत असलेल्या श्रेष्ठांच्या पत्नी पार्वतीबाई एकदम तटस्थ झाल्या. त्यांना आत कुठेतरी कालवाकालव झाल्या सारखे वाटले. ओसरीत चटईवर लवंडलेल्या राणूबाई पटकन सावरल्या. आवाजातल्या शक्तीसामर्थ्याने त्या भारावल्या गेल्या. समर्थांनी वर येऊन आपल्या मातेला साष्टांग नमस्कार केला.

तेवढ्यात हातात भिक्षा घेऊन आलेल्या पार्वतीबाईंनी ते दृश्य पहिले. त्यांना आश्चर्य वाटले. त्या थक्क होऊन पहातच राहिल्या. समर्थांनी “ आई ” म्हणून साद घातली. लौकितली चर्मचक्षुंची दृष्टी गेलेल्या त्या मातृहृदयाला आपल्या “ नारायणाची ” साद कळली. त्यांनी हंबरडा फोडला “ नारायणा...........” त्यांच्या मुखातून आनंदातिशयाने शब्द फुटेना! चरणावर मस्तक ठेवलेल्या नारायणास त्यांनी हृदयाशी कवटाळले! राणूबाई आतां थकल्या होत्या.

नारायण लग्नातून पळाल्या पासून त्या रडतच होत्या. चर्मचक्षुंना ते सहन झाले नाही. ते दृष्टिहीन झाले होते. राणूबाईंनी आपले हात नारायणाच्या चेहऱ्यावरून फिरवले. म्हणाल्या, “नारायणा! तुला पाहायला आतां डोळे नाहीत रे! पण पाहायला जीव तळमळतोय! ” समर्थांनी आईच्या नेत्रांवरून हात फिरवून त्या नेत्रांना संजीवनी दिली. मातेने आपल्या पुत्राला डोळे भरून पाहिले. अत्यानंदाने त्या म्हणाल्या, “ अरे! हे

काय? काही भूतविद्या शिकलास कीं काय? समर्थ चटकन् " हो " म्हणाले, आणि पुढे म्हणाले, " आई, अग हे भूत आतां उतरणारे नाही त्यामुळे ते कसें आहे ते ऐक तरी." राणूबाई कानामनाला एक करून ऐकू लागल्या. समर्थ म्हणाले, " काय सांगू आई,

होते वैकुंठीचे कोनी | शिरले आयोध्या भुवनी |
लागे कौसल्येचे स्तनी | तेचि भूत गे माये ||१||
मार्गी जाता वनांतरी | पाय पडला दगडावरी |
पाषाणाची झाली नारी | तेचि भूत गे माये ||२||
जनकाचे अंगणी गेले | शिवाचे धनु भंगिले |
वैदेही अंगी संचरले | तेचि भूत गे माये ||३||
पित्याचे भाकेसी | कैकयीचे वचनासी |
मानून गेले अरण्यासी | तेचि भूत गे माये ||४||
रक्षी मरणी बिभीषण | मारी रावण कुंभकर्ण |
तोडी अमरांचे बंधन | तेचि भूत गे माये ||५||
वामांगी स्त्रियेला धरिले | शरयूतीरा आले |
तेथे भरतासी भेटले | तेचि भूत गे माये ||६||
सर्वा भूतांचे हृदयी | नाम त्याचे रामराय |
रामदास नित्य गाय | तेचि भूत गे माये ||७||

समर्थांचा हा भाव त्या मायेच्या अंत:करणात खोचला गेला. तिने " रामदासा " अशी एक आर्त साद दिली, आणि रामदासस्वामींना आपल्या हृदयाशी कवटाळले. त्यांच्या मस्तकावर अश्रूंचा अभिषेक केला.

सौ.पार्वतीबाई तटस्थ होऊन हा सर्व सोहळा पहात होत्या. हातातली भिक्षा हातातच राहिली होती. नेत्रावाटे अश्रू ओघळत होते.

सर्वांच्या अंतरात असलेल्या श्रीरामदर्शनाच्या अनुभूतीने त्यांचे अंत:करण भरून आले होते. श्रेष्ठ त्यावेळी देवघरात होते. त्यांनी हे सर्व संभाषण ऐकले. ते सद्गद होऊन बाहेर आले. बंधूभेटीचा अनुपम सोहळा त्या दोघींनी डोळे भरून पाहिला. जांबवती नगरींत पुनश्च धामधूम सुरु झाली. बरेच दिवस जांबवती नगरी कीर्तनाच्या आनंदाने दुमदुमून गेली.

एक दिवस समर्थ, श्रेष्ठांचा व आईचा निरोप घेऊन गंगाप्रदक्षिणा पूर्ण करून टाकळीस परत आले. उद्धव नेत्रात प्राण आणून वाट पहात होता. त्याला नंतर कृष्णातीरी येण्यास सांगून समर्थ श्रींच्या आज्ञेप्रमाणे तारणनाम संवत्सरी शके १५६६ मध्ये कृष्णातीरी जाण्यास निघाले. मजल दर मजल करीत श्रीक्षेत्र महाबळेश्वर येथे आले.

# ३
# || जय जय रघुवीर समर्थ ||

कृष्णातीरी असलेल्या महाबळेश्वरक्षेत्रास चैतन्य प्राप्त झाले. कीर्तनाचा आणि भगवद्कथेचा अखंड धिंग सुरु झाला. भगवन्नामस्मरणाचा पूर लोटला. लोकजागृती होऊ लागली. प्रथम दर्शनीच समर्थ सर्वांना हवे हवेसे वाटत. भव्य मूर्ती, तपाचरणाची सतेज कांती, तळपत्या वैराग्याची ज्योती, वाणीत माधुर्य आणि प्रीती, शब्दात अद्भुत भाव आणि भक्ती. त्यामुळे घरोघरी समर्थांची चर्चा! सकाळ संध्याकाळ घरोघरी "जयजय रघुवीरसमर्थ" चा घोष. अनेक शास्त्री आपले पांडित्य सोडून समर्थांना शरण जाऊ लागले. त्यातच अनंत भट व दिवाकर भट ह्या महाबळेश्वरकरांचे आग्रहास्तव समर्थांनी एक संपूर्ण चातुर्मास तिथे केला. पुढे हनुमान मंदिराची स्थापना करून समर्थ श्रीक्षेत्र वाई येथे आले.

श्रीक्षेत्र वाईला कृष्णातीरी " रोकडोबा " मारुतीची स्थापना केली. त्याच्या पूजा नैवेद्याची व्यवस्था करून दिली. मग समर्थ वाई जवळच्या जरंड पर्वतावर वास्तव्यास गेले. पहाटेच माहुलीस स्नान संध्या करून जपादी नेम करून मग माधुकरी मागून पुनश्च जरंडपर्वतावर येत. त्यावेळी दुपारी मुलांबरोबर खेळून त्या मुलांना हरिनामाची गोडी लावीत व त्यांना हरिनामात सोडून देत. त्या मुक्कामात समर्थांच्याकडे श्रीजयराम स्वामी आले. हात जोडून त्यांच्या समोर उभे राहिले, म्हणाले, " गुरुमहाराज कृष्णाजीअप्पा उरणगावकर यांनी जिवंत समाधी घेतली. त्यावेळी मी

वियोगाने कासावीस झालो, म्हणून त्यांनी आपणास भेटायला सांगितले. आपणाकडून " आत्मानात्म विवेक " विचारून घेण्याची त्यांची आज्ञा आहे. त्याप्रमाणे हा दास आपल्या समोर उभा आहे. समर्थ हसले. राहा म्हणाले.

एक दिवस दुपारी भिक्षा झाल्यावर समोर बसलेल्या जयरामस्वामींना म्हणाले, " आत्मानात्मविवेक करावा | करून बरवा विवरावा | विवरोन सदृढ धरावा | जीवामध्ये ||*|| आत्मा कोण अनात्मा कोण | त्याचे करावे विवरण | तेचि आतां निरुपण | सावध ऐका ||*|| नाना प्रकारची शरीरे | सृष्टीत दिसती अपारे | तयामध्ये निर्धारे | आत्मा कवणु ||*|| दृष्टीमध्ये पहातो | श्रवणामध्ये ऐकतो | रसनेमध्ये स्वाद घेतो | प्रत्यक्ष आतां ||*|| शारिरी नाडीचा खेटा | नाडीमध्ये पोकळ वाटा | लहान थोर सगटा | दाटल्या नाडी ||*|| नाडीद्वारा धांवे जीवन | जीवनामध्ये खेळे पावन | त्या पावना सरिसा जाण | आत्माही विवरे ||*|| " जयराम स्वामी ऐकता ऐकता मंत्रमुग्ध झाले. समर्थ सांगत होते " जड अनेक आत्मा एक | ऐसा आत्मानात्मविवेक | जागा वर्तविता जगन्नायक | तयास म्हणावे ||*|| आधी आत्मानात्मविवेक  थोर | मग सारासार विचार | सारासार विचारे संव्हार | प्रकृतीचा ||*|| " जयरामस्वामींची तर समाधीच लागली. त्यांनी तर प्रकृतीचा संव्हार प्रत्यक्ष अनुभवला. शब्द केवळ उपचारासाठी वापरले गेले. मन अर्थांतरात होते. त्यामुळे मनाचे उन्मन झाले. उन्मनाचे नमन झाले. जयरामस्वामी समर्थ चरणी विनटले. मग समर्थ जयरामस्वामींच्या गुरूगृही वडगाव येथे गेले. तिथे समर्थांनी श्रीकृष्णजयंतीचा उत्सव सुरु करून दिला. त्या दिवसापासून जयरामस्वामी समर्थांना तीर्थरूप म्हणू लागले. समर्थांनी त्यांना चिरंजीव म्हणून संबोधले.

पुढे समर्थ कराडजवळ कृष्णा-कोयनेच्या संगमी आले. शहापूर जवळ एक डोंगरखिंड आहे. तिथे राहिले. समर्थ रोज शहापूरमध्ये भिक्षा मागायला जात असत. शहापूरमध्ये एका कुलकर्ण्यांच्या घरी रोज "जय जय रघुवीर समर्थ" असा जयजयकार करून भिक्षा मागत असत. पण त्यांना भिक्षा मिळत नसे. त्या घरच्या स्त्रियांना ते आवडत नसे. पण समर्थ रोज जात असत. त्या घरातल्या स्त्रियांनी हाकलून दिले कीं शांतपणे निघून जात असत. एक दिवस त्या घरातल्या स्त्रिया अत्यंत सुन्न व उदास होऊन ओसरीत बसलेल्या दिसल्या. समर्थांनी आपुलकीने चौकशी केली. त्या घरच्या स्त्रियांनी सांगितले, "घरच्या कर्त्या पुरुषाला मोगलदरबारी कुलकर्णी प्रकरणावरून जांच करीत असल्यामुळे त्यांच्या सुटकेच्या काळजीत आहोत. पण तुला गोसाव्याला ह्या नसत्या चौकशा कशाला हव्या आहेत? तुला माहित आहे कीं आम्ही तुला भिक्षा घालीत नाही." समर्थ म्हणले, " आज पासून बरोबर दहाव्या दिवशी जर तुमच्या यजमानांची सुटका झाली तर रामनामाचा जप कराला कां?" त्या बाई 'हो' म्हणाल्या. 'बरे तर' असे म्हणून समर्थ तेथून निघून गेले.

बरोबर अकराव्या दिवशी बाजीपंत कुलकर्णी सुखरूप घरी आले. त्यांच्या पत्नी सतीबाईंना खूप आनंद झाला. त्यांना त्या गोसाव्याची आठवण झाली. पण त्या दिवसा पासून समर्थ येतच नव्हते. त्यांनी बाजीपंतांना काही विचारण्यापूर्वीच बाजीपंत म्हणाले, " तुम्ही कोण कारकून पाठवला होता तो फारच हुशार होता. त्याने बादशहाची समजूत घालून हिशेब जुळवून दिला. म्हणून मी सुटलो. त्या कारकुनाने आपले नाव दासोपंत असे सांगितले. तो कुठे आहे?" ते ऐकून सतीबाईंना खूपच आश्चर्य वाटले. आपण कोणासच पाठवले नाही. पण त्या दिवसापासून तो

गोसावी आलाच नाही. त्याचे स्मरण होऊन सतीबाईच्या डोळ्यात टचकन् पाणी आले. त्यांनी समर्थांची सर्व हकीकत आपल्या पतीला सांगितली. मग मात्र उभयतांनी समर्थांचा शोध घेण्यास सुरुवात केली. पण शोध लागला नाही. म्हणून बाजीपंत उपवास करण्यास बसले. बरोबर तीन दिवस कडक उपवास झाल्यावर समर्थ अचानक अंगणात आले व त्यांनी "जयजय रघुवीरसमर्थचा" निनाद केला. आतां सर्वांनाच त्या घोषात असलेले सामर्थ्य प्रत्ययास आले होते. बाजीपंत व सतीबाई अक्षरशः हंबरडा फोडून त्यांच्या चरणी लागले. चरणावर मस्तक टेकून अश्रुपात करू लागले. समर्थांनी त्यांच्यावर अनुग्रह केला. अनुग्रहानंतर सतीबाई सतत नामस्मरण करीत असायच्या. त्यांची समर्थांवर अद्वितीय निष्ठा जडली. त्या समर्थांच्या दर्शनासाठी रानोमाळ हिंडायच्या. दर्शनानंतरच भोजन घ्यायच्या. तसा नियम न करताच तो सहज भाव झाला होता. समर्थही त्यांची परीक्षाच पहावयाचे. त्याही समर्थांच्या परीक्षेत पास व्हायच्या. त्यांच्या आग्रहावरून समर्थांनी शहापूरमध्ये हनुमान मंदिर स्थापून दिले.

समर्थांच्या कीर्तनाचा धडाका चालूच होता. अनेक नवनवे शिष्य तयार होत होते. एकदा समर्थ कोल्हापुरास "अंबाबाईच्या" समोर कीर्तन करीत होते. त्यावेळी पारगावचे पाराजीपंत कीर्तन ऐकावयास आले होते. कीर्तन ऐकून त्यांनी समर्थांना अनुग्रह मागितला. समर्थांनी होकार दिला. पाराजीपंतांना फार आनंद झाला. त्यांनी त्यासाठी आपल्या गावी एक छोटा उत्सव केला. त्या प्रसंगी एक चुणचुणीत मुलगा समर्थांना फार आवडला. त्यांनी पराजीपंतांकडे त्याची चौकशी केली. तो पराजींचा भाचा 'अंबाजी' होता. समर्थांनी त्याला विचारले, "माझ्या बरोबर येतोस कां?"

तत्क्षणी मोठ्या आत्मविश्वासाने अंबाजी "हो" म्हणाला. अंबाजीची आई त्यावेळी अंबाजीच्या पाठी होतीच. तिने पटकन पुढे होऊन आपल्या दुसऱ्या मुलासह समर्थांना साष्टांगनमस्कार केला. समर्थांना म्हणाली, " आम्हा तिघांचाही स्वीकार करावा. अंबाजी माझा थोरला मुलगा हा दुसरा दत्तात्रय. ह्यांच्या वडिलांनी संन्यास घेतला. त्यामुळे त्रिवर्ग आपल्या सेवेत रुजू होण्यास उत्सुक आहेत." समर्थांनी त्या तिघांनाही अनुग्रह दिला. आणि त्या तिघांसह समर्थ पुढे निघाले. त्यांनी टाकळीस निरोप पाठवून उद्धव गोसावींस बोलावून घेतले. समर्थ शिरगावी उद्धवाची वाट पहात थांबले. शिरगावी मठस्थापना केली. त्या मठाची व्यवस्था अंबाजीची आई व दत्तात्रय याच्यावर सोपविली. उद्धव शिरगावी आले. समर्थ, उद्धव व अंबाजी यांना घेऊन मसूरास आले.

समर्थांना अनेक शिष्य झाले होते. त्यांना हाताशी धरून समर्थांनी मसूरमध्ये रामनवमीचा उत्सव करावयाचे ठरवले. मसुरास "ब्रह्मपुरी" म्हणत. समर्थांनी तिथे हनुमान मंदिराची स्थापना केली. मग रामनवमीच्या उत्सवाची प्रेरणा दिली. उत्सवात मिरवणूक निघणार. दिंड्या, पताका, काठ्या इत्यादी उंच उंच छबिना जाणार. रस्ता भरपूर मोठा होता पण मंदिरात जाण्याच्या मार्गावर एक मोठा आम्रवृक्ष होता. त्याच्या फांद्या रस्त्यावर आलेल्या होत्या. त्या कापून टाकणे आवश्यक होते. पण मुलुख विजापूरकर निजामाच्या अधिपत्या खालील. मसुरातल्या यवन अधिकाऱ्यांनी फांद्या कापण्यास मनाई केली. उत्सवाला तर अगदी थोडे दिवस उरलेले. शिष्यांनी समर्थांना गाऱ्हाणे घातले. विजापुरास जाऊन बादशहाचे फर्मान आणल्याखेरीज यवन अधिकारी ऐकणार नव्हते. विजापुरास जाऊन येई पर्यंत उत्सवाचा दिवस जाणार होता. समर्थांनी

ऐकून घेतले. म्हणले काळजी करू नका. मग जो तो आपल्या उद्योगात गर्क झाला.

थोड्याच वेळात समर्थ एकाएकी नाहीसे झाले. विजापूरच्या बादशहाजवळ प्रगट झाले. बादशहा डोळे विस्फारून पाहू लागला. त्याला योगी लोक असे प्रगट होतात हे माहित होते. पण आत्ता प्रत्यक्ष अनुभवत होता. त्याने पटकन् उठून अभिवादन केले. कुठले काय वगैरे चौकशी केली. समर्थांनी मसुरातल्या उत्सवाची कल्पना दिली. आम्रवृक्षाच्या रस्त्यावर येणाऱ्या फांद्या कापण्याची लेखी परवानगी मागितली. बादशहाने दस्तुरखुद्द मोहोरबंद लिफाफा तयार करून दिला. समर्थ जसे प्रगट झाले तसे गुप्त झाले. मसुरातल्या यवन ठाणेदारास भेटून त्याला बादशहाचा मोहोरबंद लिफाफा दिला. ठाणेदार चूप बसला. उत्सवातल्या लोकांनी फांद्या कापण्याची जय्यत तयारी केली. अंबाजी, उद्धव व इतर अनेक शिष्य हिरीरीने पुढे आले. पण समर्थांनी शेंड्याकडे बसूनच फांदी कापायची ज्याची तयारी असेल त्यानेच फांदी कापावी. झाले अंबाजी सोडून सगळेच मागे सरकले. अंबाजी पुढे सरसावला. सर सर झाडावर चढला. शेंड्याकडे पाठ करून फांदीच्या खोडाकडील बाजूवर कुऱ्हाडीचे घाव घालू लागला. ते पाहून समर्थ आपल्या उद्योगाला निघून गेले. त्या फांदीच्या खाली एक मोठी विहीर होती. फांदी कापली गेली कीं त्या विहिरीतच पडणार होती. पण अंबाजी फक्त समर्थांची आज्ञा पळत होता. नामस्मरणात सपासप घाव घालीत होता. थोड्याच वेळात शेवटचा घाव बसला, फांदी काडकन् मोडली, आणि अंबाजी पाहाता पाहाता फांदी सकट विहिरीत पडला. पाणी खूपच खोल होते. विहीर चांगलीच मोठी होती. लोकांनी झटपट फांदी वर काढली पण अंबाजी दिसेना.एकच

आरोळी उठली. अंबाजी बुडाला. तास झाला दीड तास झाला. लोक चांगलेच घाबरले.

तोवर समर्थांना बातमी मिळून समर्थ तिथे आले. विचारले. किती वेळ झाला? लोक म्हणाले किमान एक तास तरी झाला. समर्थ घाबरून म्हणाले, म्हणजे मेला बिला कीं काय? म्हणून धावतच विहिरी जवळ आले. तो समर्थांचा अभिनिवेश पाहून लोकांच्या डोळ्यात पाणी आले. समर्थांनी विहिरीच्या काठांवरून हांक दिली. “अंबाजी! आहेस कां रे?” आतून अंबाजीचा आवाज आला “ कल्याण आहे महाराज! ” “अरे मग वर ये कीं! ” अशी आज्ञा होताच अंबाजी वर आला. समर्थ म्हणाले. “हे अशी निष्ठा पाहिजे.” ह्याचे नाव आजपासून कल्याण झाले चला! आणि समर्थांनी देवापुढे साखर ठेवली व अंबाजीचे नाव “कल्याण” ठेवले म्हणून सर्वांना वाटली. सर्व शिष्यांनी समर्थांचा जयजयकार केला. रस्ता मोकळा झाला. उत्सव आनंदात साजरा झाला. लोक कल्याणाला “कल्याणस्वामी” म्हणून संबोधू लागले.

इतर अनेक शिष्यांसह उद्धव आणि कल्याण यांना घेऊन समर्थ चाफळला येऊन राहिले. चाफळात समर्थांना अनेकजण शरण आले, व त्यांचे शिष्य होऊन राहिले. समर्थांना चाफळात श्रीराममंदिर स्थापण्याची इच्छा झाली. सगुणोपासनेमुळे जडातून सूक्ष्मात प्रवेश करण्याचा मार्ग मोकळा होतो, म्हणून मंदिरांवर समर्थांचा भर होता. त्यांनी चाफळच्या ग्रामाधिकाऱ्याकडे जागा मागितली. अधिकाऱ्याने नदीच्या पलीकडे असलेली मसणवटीची जागा दिली. तिथे अनेक वेताळ, खंकाळ, म्हसोबा इत्यादींचे गोटे होते. समर्थांनी तत्काळ जागा स्वीकारली. उद्योगाला लागले. मसणाजवळच्या वेताळ,खंकाळ,म्हसोबा,खवीस इत्यादी गोट्यांना

हात कोण लावणार? समर्थांनी “जयजय रघुवीरसमर्थ”चा घोष करून त्या सर्व गोट्यांना मांड नदीत मुक्ती द्यायला सुरुवात केली. स्वत: समर्थच कामाला लागलेले पाहून शिष्यांनीही कमरा कसल्या. मग काय भक्ती, भाव आणि कर्मयोग यांचा त्रिवेणी संगम निर्माण झाला. समर्थ सर्व म्हसोबांना मुक्ती देत होते, पण एका थोरल्या म्हसोबाने आपणास ठेवावे म्हणून विनवले. समर्थांनी दूरवर दिपमाळे जवळ जागा दिली. रामनवमी नंतरच्या दिवशी दहीभातावर खुश राहण्याची आज्ञा दिली. समर्थांच्या योजनेखाली काम सुरु झाले. समर्थ शिष्यपरिवार अनेकविध होता. त्यात पाथरवट, सुतार, गवंडी, शिल्पकार, कुशल अभियांत्रिकी असे सारेजण होते. तसेच टिपणीस, हिशेबनीस, कारकून इत्यादी सर्वजण होते. फक्त मजूर नव्हते. सर्वजण मजूर झाले. बिगर मजुरीचे. कुणाएकाच्या देणगीवर अथवा मक्तेदारीवर मंदिर उभे रहात नव्हते तर ते आत्मियतेच्या व एकात्मतेच्या पायावर उभे रहात होते. समर्थांची योजकता मोठमोठ्या अभियांत्रिकींना लाजवणारी होती. मंदिराच्या इमारतीसाठी काय लागणार नव्हते? समर्थांनी अगदी अगदी खणखणीत वाळलेल्या, झणझणीत भाजलेल्या, टणटणीत विटांची रास स्वत:च्या देखरेखीखाली तयार करून घेतली होती. प्रत्येक वीट नऊ तसू लांब, सात तसू रुंद व तीन तसू उंच अशा मापात तपासून घेण्यासाठी तपासनीस बसवले होते. सुतारांकडून उत्कृष्ट चौकटी, मेहरपी, दारे खिडक्या इत्यादी अगदी दर्जेदार बनवून घेतल्या होत्या. लोहाराकडून घणघणीत कड्या, कोयंडे, चिवे, मिजागऱ्या, हलखे इत्यादी वस्तू बनवून घेतल्या. प्रत्येक जण आपल्या कामात तत्पर व तरबेज होता. नैपुण्य दाखवीत होता. तिथे मुशारा मिळत नव्हता. मिळत होती फक्त भिक्षा! सगळेच खुश होते. भिक्षा भक्षणा आणि जल दक्षिणे वर!

सर्व जण कामात गर्क असत. मुखी नाम, करी काम, मनी राम आणि देही घाम अशी ती उच्च स्थिती होती. कुणी कोणाला हे कर म्हणत नव्हते कीं कुठे काम अडून रहात नव्हते. समर्थ सर्वांची काळजी घेत होते. धडाक्यात मंदिर उभे राहिले.

आतां श्रीरामांच्या मूर्तीचे काय? हा प्रश्न सगळ्यांना पडलाच! समर्थांच्या कल्पनेतल्या मूर्ती बनवायला शिल्पकार वर्ष सहामहिने मागू लागला. समर्थांना तेवढा वेळ नव्हता. समर्थ श्रीरामाची अगदी कळवळून प्रार्थना करीत होते. कोणी सुचवत होते “आपण आयत्या तयार मूर्ती विकत आणू .“ कुणी म्हणत होते “मी इथेच घडवतो, जशा होतील तशा होतील.” कुणी काही तर कुणी काही. समर्थ सर्वांचे ऐकून घेत आणि शांतपणे उठून निघून जात. कुणाला काही अंदाज लागेना.

समर्थ एकांतात बसत. कळवळून प्रार्थना करीत. कळवळून श्रीरामांना म्हणायचे, “ राघोबा उदारा ये माझ्या मंदिरा | जानकीच्या वरा देवराया || चित्त निरंतर जडले तुझे पायी | धाऊनिया येई रामराया || प्रेमे स्फुंदताहे उभारुनी बाहे | वाट तुझी पाहे रामदास || ” समर्थ अक्षरशः असा टाहो फोडत. ऐकणाऱ्याच्या डोळ्यातून अश्रूंचा पूर लोटायचा. प्रभुरामचंद्र तरी त्याला अपवाद कसे ठरतील? भक्तवत्सल, दीनदयाळ, दीनानाथ अशी बिरुदे मिरवणारे श्रीराम समर्थांसाठी काय करणार नाहीत? समर्थांना स्वप्न साक्षात्कार झाला. “जा कृष्णेच्या शिवनाभीच्या डोहात ब्रह्मकृत माझी मूर्ती आहे. ती काढून आण. त्यात मी स्वत: संचार करीन. स्वामींना आनंद झाला. समर्थ लगेच कृष्णेच्या डोहाकडे जाण्यास निघाले.

शिवनाभीचा डोह अंगापूरच्या जवळ आहे. तिथे आले. रात्री गजानन मंदिरात थांबले. सकाळीच स्नान-संध्या करून शिवनाभी डोहात बुडी मारली. एका ऐवजी दोन मूर्ती मिळाल्या. एक श्रीरामाची आणि दुसरी महिषासुरमर्दिनीची. दोन्ही मूर्ती काठावर आणून त्यांची समर्थांनी पूजा केली. साष्टांग नमस्कार घातला, आणि मूर्ती घेऊन निघाले. मूर्ती काठावर आणताना कोण्या गावकऱ्याने त्यांना पाहिले. त्याने ते षट्कर्णी केले. गावकरी गावच्या पाटलाकडे गेले. पाटलाच्या मसलतीने समर्थांना गाठले. एव्हाना समर्थ अंगापूर सोडून चाफळच्या मार्गाला लागले होते. चेरगावाच्या रानात सुकाटण्याच्या खिंडीजवळ गावकऱ्यांनी त्यांना गाठले. समर्थ शांतपणे उभे राहिले. निश्चयपूर्वक म्हणाले, “ मूर्ती डोहातल्या आहेत. मी नेणारच! ” गावकरी म्हणू लागले. आमच्या पूर्वजांनी डोहात टाकल्या. त्यामुळे आमचा हक्क आहे. मूर्ती आम्ही परत नेणार.

समर्थांनी मूर्ती भूमीवर ठेवल्या. म्हणाले “घेऊन जा! पण तुम्ही नेल्या नाही तर मात्र मी घेऊन जाईन.” गावकऱ्यांना मूर्ती हालवता पण येईनात. त्यांनी समर्थांची क्षमा मागितली. समर्थांनी पण लगेच क्षमा केली. अज्ञानजन्य पापांना समर्थच क्षमा करू शकत होते. समर्थ मूर्ती चाफळला घेऊन आले. अंगापूरकरांचे नाते चाफळशी जोडले गेले. समर्थांनी उत्सवातल्या मिरवणुकीतील सिंहासनाच्या काठीचा मान अंगापुरकरांना दिला. सर्वत्र उत्साह संचारला. रामनवमीच्या पूर्वीच मूर्ती आल्याचा आनंद प्रत्येकाच्या मुखावरून ओसंडून वाहात होता. सिंहासनाधिष्ठित श्रीरामांची मूर्ती वाजत गाजत आणली गेली. अनुपम सोहळा झाला. मिरवणुकीत सनया, चौघडे, भेरी, चंद्रानना, झल्लरी, टाळ, घोळ, मृदुंग इत्यादी असंख्य वाद्यांचा आवाज आकाश दुमदुमवून टाकीत होता. जणू

स्वर्गातल्या देव-देवतांना ते एक आवाहन होते. पण त्यांनी तर आकाशात आधीच दाटी केली होती. शके १५७० साली मंदिरात श्रीराम स्थापना झाली. चाफळचा उध्दार झाला. श्रीराम चाफळातल्या मूर्तीत प्रविष्ट झाले. चाफळात श्रीरामांचा दरबार भरला. चाफळात मूर्तिमंत चैतन्य ओसंडून वाहू लागले. चाफळखोऱ्यात समर्थांनी मंदिर बांधायला सुरुवात केल्यापासून चाफळखोऱ्याची कीर्ती गावोगाव पसरू लागली होती.

समर्थांचे अनेक शिष्य गावोगावी कीर्तन करीत. त्या कीर्तनातून समर्थांच्या कार्याची माहिती देत. अशाच एका कीर्तनात गिरीगोसावींनी सरकारस्वामींना म्हणजे शिवाजीमहाराजांना ही माहिती दिली. छत्रपती शिवाजीमहाराजांनी लगेच ३०० होन स्वत:च्या माणसाबरोबर चाफळला पाठवून दिले. श्रीमंत योग्याची सेवा श्रीरामचरणी रुजू झाली. शिवाजी महाराजांना आधीच संतसमागमाची आवड होती. त्यात संत तुकाराम महाराज, संत श्रीसमर्थ, रंगनाथस्वामी महाराज इत्यादी अनेक संत महाराष्ट्रात ब्रह्मविद्येचा सुकाळ करीत होते. संत समागमास उत्सुक असलेल्या निश्चयाच्या महामेरुला समर्थ भेटीची ओढ लागली. जेंव्हा श्रीशिवाजी महाराज तुकाराम महाराजांना शरण गेले होते व त्यांचा अनुग्रह मागितला होता तेंव्हा तुकाराम महाराजांनी शिवाजी महाराजांना असा उपदेश केला होता कीं "सद्गुरू श्रीरामदासाचे भूषण | तेथे घाली मन | चळू नको | राया छत्रपती | ऐकावे वचन | रामदासी ध्यान | लाव वेगी || रामदास स्वामी | सोयरा सज्जन | त्यासी तन मन | अर्पी बापा ||" तुकाराम महाराजांचा हा उपदेश छत्रपती शिवाजी महाराजांनी शिरोधार्य मानला. शिवाजीमहाराजांची तळमळ वाढली. शिवरायांनी निवडक सैनिकांसह चाफळकडे कूच केले.

छत्रपती शिवाजीमहाराज चाफळला आले. समर्थ मठात नव्हते. शिवाजीमहाराजांनी श्रीरामप्रभूंचे दर्शन घेतले. त्यांचा जीव समर्थ भेटीसाठी तळमळत होता. समर्थांच्या भेटीची ओढ लागली होती. मंदिर पाहून व समाधान व्यक्त करून महाराज परतले. राजकारणाच्या व्यापातही त्यांच्या मनात समर्थ घर करून बसले होते. संत तुकाराममहाराजांच्या उपदेशामुळे चित्त समर्थांकडे लागले होते. त्यांनी व्रतोपवास करण्यास सुरुवात केली. शके १५७१वैशाख शुध्द चतुर्थीला रात्री शिवाजी महाराजांना समर्थांनी स्वप्नात दर्शन दिले. त्या दर्शनामुळे जागे झाल्यावर शिवाजी महाराजांची समर्थ भेटीची तळमळ अधिकच वाढली. मातोश्री जीजाबाईंची आज्ञा घेऊन महाराज समर्थांच्या भेटीस निघाले. राज्यकारभार बाजूला सारून निघाले. श्रीक्षेत्र महाबळेश्वरी आले. त्यांची तळमळ वाढतच होती, आणि अगदी अनपेक्षित प्रकार घडला. श्रीक्षेत्र महाबळेश्वरी शिवाजीमहाराज असताना समर्थांचा एक शिष्य आला. त्याने समर्थांचे एक पत्र शिवाजीमहाराजांना दिले. महाराजांनी ते पत्र मस्तकी धारण करून वाचायला सुरुवात केली. समर्थांनी पत्राची सुरुवात केली होती, " निश्चयाचा महामेरु | बहुत जनांसी आधारु | श्रीमंत योगी | जाणता राजा || आचारशील विचारशील | दानशील धर्मशील | सर्वज्ञपणे सुशील | सकळा ठायां || या भूमंडळाचे ठायी | धर्मरक्षी ऐसा नाही | महाराष्ट्रधर्म राहिला काही | तुम्हा करिता | कित्येक दुष्ट संहारिले | कित्येकांस धाक सुटले | कित्येका आश्रय झाले | शिवकल्याण राजा | तुमचे देशी वास्तव्य केले | परंतु वर्तमान नाही घेतले | ऋणानुबंधाचे विस्मरण झाले | काय नेणू || सर्वत्र मंडळी धर्ममूर्ति | सांगणे काय तुम्हाप्रति | धर्मस्थापनेची कीर्ति | सांभाळली पाहिजे ||"

छत्रपती शिवाजी महाराज भावविवश होऊन एक एक ओवी वाचताना अश्रुंचे सरच्यासर पांढऱ्याशुभ्र अंगरख्यावर ढाळीत होते. समर्थांनी केलेल्या कौतुकाने ते भारावून गेले होते. पत्र मिळाले तसे शिवाजी महाराज निर्धाराने समर्थांना भेटायला निघाले. त्यांच्या मनावर "ऋणानुबंधाचे विस्मरण झाले" या वचनाचा अनावर परिणाम झाला. समर्थांचे पत्र परत एकदा मस्तकी धारण केले, आणि तत्काळ क्षमा याचनेचे पत्र लिहिले. आलेल्या शिष्याचा आदर सत्कार करून त्याच्या जवळ दिले. सन्मानाने त्याची बोळवण केली. आपण लगेच समर्थांच्या भेटीस जाण्यास निघाले.

शिवाजीमहाराज चाफळला आले. बरोबर बाळाजी आवजी चिटणीस, निळो सोनदेव इत्यादी मातब्बर मंडळी होती. मठात आले. समर्थ मठात नव्हते. समर्थ शिष्य अक्का होत्या. त्यांना सगळ्यांनी नमस्कार केला. समर्थ शिंगणवाडीस असल्याचे कळले. छत्रपती शिवाजी महाराज लगेच निघाले. खूप दमले होते. अक्कांनी विश्रांती व भोजन प्रसादाचा आग्रह केला, पण महाराजांचा एकच निश्चय, समर्थ चरणांचे दर्शन झाल्याखेरीज उपवास सोडणार नाही, मग अक्कांनी दिवाकर भटजींना महाराजांना मार्ग दाखवण्यास पाठवले. दिवाकर भटजींना धन्यता वाटली. ते उत्साहाने महाराजांना मार्ग दाखवण्यास निघाले. पुढे दिवाकर मागे महाराज. मार्ग करवंदाच्या काटेरी जाळीने भरलेला. पुढचा माणूस सहा हातावरूनही दिसणार नाही अशी वळणे. पाउलवाट अगदी छोटी.

ह्याच समयी कल्याण गोसावी महाराजांचे पत्र घेऊन समर्थांच्या जवळ पोहोचले होते. एका विशाल वटवृक्षाखाली समर्थ मृगाजिनावर

बसले होते. समर्थांनी पत्र वाचले. इतक्यात दिवाकर भटजी महाराजांना घेऊन तिथे आले. शिवाजीमहाराजांना पाहून समर्थ उद्गारले, “ अरे वा:! शिवबा आपण आणि आपले पत्र बरोबरच आलात. आम्ही तुमच्या देशातच आहोत. मग एवढी काय तातडी होती?”

समर्थांच्या त्या शब्दांनी छत्रपती गहीवरले. त्यांचा कंठ सद्गद झाला. त्यांनी समर्थांच्या चरणावर मस्तक ठेऊन नेत्राश्रूंनी चरणक्षाळण केले, आणि समर्थांना म्हणाले “ प्रभो आपण स्वप्नदर्शनांत दिलेला अनुग्रह आतां प्रत्यक्षात मिळावा ही प्रार्थना आहे.” समर्थ म्हणाले, “ शिवबा स्वप्नातील गोष्ट वेगळी. प्रत्यक्षात सामग्री हवी. उपचाराखेरीज प्रत्यक्षात कसे होणार?”

शिवाजीमहाराज म्हणाले, “ स्वामींनी फक्त अनुज्ञा द्यावी! सामग्री हजर होण्यास वेळ लागणार नाही! ” समर्थ शिवाजीमहाराजांच्या उत्तराने प्रसन्न झाले. समर्थांनी अनुज्ञा दिली. शिवाजीमहाराजांनी सर्व सामग्री सज्ज ठेवलीच होती. बरोबर आलेल्या बाळाजी आवजींनी बरोबर आणलेले पूजा साहित्य सादर केले. दिवाकर भटजींनी षोडशोपचार पूजा सांगितली. समर्थांचा अनुग्रह मिळाला. त्या दिवशी संपूर्ण महाराष्ट्र सनाथ झाला. तो दिवस होता वैशाख शुद्ध नवमी शके १५७१ गुरुवार. हा दिवस महाराष्ट्रातल्या हिंदवी साम्राज्याच्या  छत्रपतींना छत्र देऊन गेला. समर्थांचा हात शिवाजीमहाराजांच्या मस्तकी पडताच त्यांना समाधी लागली. त्या समाधीतच समर्थांनी महाराजांना बोध केला. राजांची धारणाशक्ती प्रचंड व प्रगल्भ होती. महाराज काही क्षणातच विदेही झाले. आणि स्वत:च स्वत:ला न्याहाळत बसले.स्वत:च्या संकोचाने स्वत:पासून दूर झाले, समर्थांनी जे दिले ते राजांनी अंगी लाऊन घेतले. जन्म

मरणाच्या क्षूद्र कल्पनेचे विकल्प नाहीसे झाले. “परमार्थी तो राज्य धारी | परमार्थ नाही तो भिकारी ||” हा अनुभव त्यांनी घेतला. राज्यवैभवासह सर्व विश्वातल्या वैभवाविषयीची राजांची भावना बदलून गेली. आपण कोणीच नसून हे सर्व वैभव केवळ श्रींचे आहे ही धारणा दृढ झाली. क्षणात बसल्या जागीच तिन्ही लोक भोगवणाऱ्या मनाचे उन्मन झाले. राजे स्वत: सद्गुरुस्वरूप झाले. चिन्मय झाले. परमार्थ अंगी मुरु लागला. त्यावेळी समर्थ म्हणाले, “ बहुत दिवसांचे बंड | म्लेंच्छ माजले उदंड || त्यांचे करून दुखंड | राज्य करावे ||” छत्रपतींनी तो उपदेश शिरोधार्य मानला. समर्थांनी राजधर्म, क्षात्रधर्म जागवला. राजधर्म जागवून शिवाजीमहाराजांना स्फूर्ती दिली. महाराज कृतकृत्य होऊन समर्थांचा आशीर्वाद घेऊन निघाले.

समर्थांची कीर्ती अधिकाधिक वाढतच होती. विशेषत: तुकाराम महाराज त्यांच्या बाबतीत जास्त दक्ष होते. धर्मजागरात त्यांना सहाय्य करीत होते. त्याकाळी वामनपंडीत हे एक नाणावलेले शास्त्री होते. राजदरबारी मान्यताप्राप्त झालेले होते. शास्त्रात वाद घालून वामनपंडित इतर विद्वान मंडळींना राजदरबारी पराभवीत असत. त्यांचेकडून जयपत्रे घेत असत. एकदा त्यांना काशीच्या पंडितांमध्ये वादविवाद करावा लागला. त्यावेळी वादाचा विषय होता “शिव थोर कीं विष्णू थोर?” त्यांत एका शास्त्रीबुवांनी “शिव थोर” हा युक्तिवाद सर्वांना पटवून दिला. त्यावेळी वामनपंडित निष्प्रभ झाले. वामनपंडीत चक्क गोंधळले व त्यांनी शरणागती पत्करून भगवंताची प्रार्थना केली.

“ नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपती हरि |
हरि जो तापाते उचलुनी कृपासिंधु लहरी |

हरि वाटे काळासरिस विपती मृत्यु भुजगा |
जगाचा तूं ऐसा धनि कवण तो पाव मजगा ||”

पराभव पत्करून अत्यंत विमनस्क होऊन वामनपंडित काशी सोडून निघाले. फिरत फिरत महाराष्ट्रातल्या इंद्रायणी काठी असलेल्या देहूला आले. तिथे श्रीतुकाराममहाराजांचे भावभक्तीने ओथंबलेले अभंग संकीर्तन ऐकून प्रभावित झाले. वामनपंडीत तुकाराम महाराजांना शरण गेले. त्यांचा अनुग्रह मागू लागले. तुकाराम महाराज त्यांना म्हणाले, “ आपण सत्पात्र ब्राह्मण आहात. शास्त्रव्युत्पत्ती व काव्यव्युत्पत्ती जाणण्याचे आपले सामर्थ्य अगाध आहे. शास्त्रात ‘वर्णानां ब्राह्मणोगुरु:’ असे सांगितले आहे. त्या नात्याने आपणच माझे गुरु होता. त्यामुळे अनुग्रह घ्यायचा असेल तर तो समर्थांचा घ्या. तो अधिकार त्यांचा आहे.”

त्याप्रमाणे वामनपंडित समर्थांना शरण गेले. समर्थांनी त्यांना अनुग्रह दिला. समर्थांनी त्यांना तपासाठी बद्रिकाश्रमात पाठवून दिले. बारावर्षे तप करून वामनपंडित परत समर्थांच्या सेवेत रुजू झाले. समर्थांनी त्यांना मराठीत कवित्व करण्याची आज्ञा दिली. वामनपंडितांच्या कविता फार सुंदर असत. त्यात अगदी सहजतेने सुरेख यमक साधलेले असत, म्हणून समर्थ त्यांना “यमक्या वामन” असे संबोधित असत. वामनपंडित रोजच समर्थांच्या समोर बसून दासबोध वाचीत असत. वामनपंडीत स्वत: शास्त्री होते. त्यामुळे ते अतिशय चिकित्सकपणे वाचन करीत. त्यांना सातव्या दशकातल्या ३ऱ्या समासातली १४ ब्रह्मांची संकल्पना अस्तित्वासाठी मान्य होती, पण अशाश्वत ठरवून त्यांचे “ म्हणोनिया सर्व ब्रह्माते | नाश आहे || ” हे काही पटेना, कारण वामनपंडितांना तसा शास्त्राधार वाचल्याचे काही आठवत नव्हते. त्यांनी खूप प्रयत्न केला, पण ग्रंथातही सांपडेना!

त्यांनी समर्थांना आपली शंका विचारली. समर्थांनी त्यांना अर्थ समजून सांगितला. पण वामनपंडीतांचे काही समाधान होईना. ते सारखे शास्त्राधार विचारत होते. त्यामुळे हुज्जत वाढत गेली. समर्थांनी उग्ररूप धारण केले. समर्थ साक्षात् हनुमंताचे प्रचंड रूप धारण करून विचारू लागले. “ बोल वामन! शंका फिटली कीं नाही?” वामनपंडित घाबरून “हो” म्हणाले. तसे समर्थ पुन्हां सौम्यरूप धारण करून म्हणाले, “ हनुमंताने कोणता शास्त्राधार दिला? म्हणून तुम्ही त्याला हो म्हणालात ते तरी आम्हाला कळू द्या! ” यावर वामनपंडितांची चांगलीच गाळण उडाली. त्यांनी समर्थांची क्षमा मागितली. केवळ भयामुळे आपण हनुमंतास “हो” म्हटल्याचे वामनपंडीतांनी कबूल केले. त्यावर समर्थ म्हणाले आपण स्वत: पंडित आहात आणि शास्त्राधार आम्हाला विचारता! ठीक आहे. मग समर्थांनी वामनपंडिताना “बृहदारण्यक उपनिषद” पहाण्यास सांगितले. त्यात त्यांना तो आधार मिळाला. त्यावर वामनपंडीतांनी समर्थांना साष्टांग नमस्कार केला. त्यावर समर्थ म्हणाले, “अंत:करण निर्भय झाल्याखेरीज आत्मानात्म विवेक व निश्चयाचे आत्मज्ञान होत नाही. आणि आत्मज्ञान रोमारोमात भिनल्याखेरीज आत्मनिवेदन होत नाही, ‘ परब्रह्मा एवढे थोर नाही | श्रवणा परते साधन नाही | कळल्याविण काहीच नाही | समाधान ||’ ” असे सांगून समर्थांनी वामनपंडितांना परत तपाला बसवले. समर्थांची आज्ञा शिरसावंद्य मानून वामनपंडित तपाचरणास बसले.

शिवाजी महाराजांचे चाफळला नित्य येणे जाणे सुरु झाले. शिवाजीमहाराजांचा समर्थांना परळीला येण्याचा आग्रह होता. सुरुवातीस समर्थ काहीच बोलत नव्हते. शिवाजीमहाराज आपला आग्रह सोडत नव्हते. महिन्यातून चार वेळा शिवाजीमहाराज समर्थांच्या दर्शनास येत

होते. प्रत्येक वेळी आग्रह करीत. शिवाजीमहाराजांची भक्ती व भाव पाहून एकदा समर्थ “हो” म्हणाले. शिवाजीमहाराजांना फार आनंद झाला. त्यांनी लगेच परळी जवळचा किल्ला मुक्रर केला. किल्ल्यात चैतन्य उत्पन्न झाले. सर्व सोयी समर्थांना विचारून केल्या जात होत्या. नैऋत्य दिशेकडून गडावर प्रवेश मिळण्यास बराच वाव होता. परचक्राचा तो एक मोठाच धोका होता. तो टाळण्यासाठी शिवाजीमहाराजांनी कडा वाढवण्याचे ठरवले. तसे त्यांनी समर्थांना विदित केले. समर्थांनी लगेच निर्णय दिला. कडा वाढवण्याची गरज नाही. त्याची व्यवस्था मी करतो! असे म्हणून, समर्थांनी नैऋत्य कड्यावर हनुमान मंदिराची स्थापना केली. त्याची प्रचीती अनेकांना त्या काळात आली. शिवाजीमहाराजांनी सुरेख व टुमदार मंदिर बांधून दिले. समर्थांनी अंगापूरच्या डोहात मिळालेली महिषासुरमर्दिनीची मूर्ती गडावर आणवून घेतली. किल्ल्याच्या प्रवेशद्वारावर दक्षिणेकडे तिची स्थापना केली. समर्थांनी किल्ल्याचे नाव “सज्जनगड” असे ठेवले.

शिवाजीमहाराजांनी किल्ला समर्थांचे स्वाधीन केला. पूजा-अर्चा इत्यादीची व्यवस्था करण्यासाठी नरसोमलनाथ यांना गडावरचे कारभारी म्हणून नेमले. समर्थांचे वास्तव्य सज्जनगडावर शके १५७२तल्या, कार्तिकात सुरु झाले. समर्थ अनेक शिष्यांसह किल्ल्यावरून फिरून येत असत. कल्याण स्वामी सदैव समर्थांच्या बरोबर असत. एकदा असेच किल्ल्याच्या तटावरून फिरत होते. पश्चिमेला सायंसंध्या गुलाबी छटा दाखवीत होती. हिरवीगार वनश्रीची शोभा पहात पहात सगळे चालले होते. वाराही मनमुराद वाहात होता. त्यावेळी वाऱ्याला काय लहर आली. वाऱ्याने समर्थांची छाटी उडवली. छाटी वाऱ्याच्या झोताने तटाखाली

गेली. समर्थ पटकन म्हणाले कल्याणा छाटी! आणि कोणाला काही कळण्याआधीच कल्याणाने “जयजय रघुवीरसमर्थ” असे म्हणून तटावरून छाटीच्या मागोमाग खाली उडी घेतली. इतर शिष्य पहात होते. खाली खूप खोल दरी होती. दाट झाडी होती. काय होणार कल्याणाचे? कल्याणने उडी घेऊन छाटी पकडलेली आणि तो झाडांत पडताना सर्वांनी पाहिला. पण झाडी इतकी दाट होती कीं नंतर तो दिसेनासा झाला. सर्वांना फार वाईट वाटले. कल्याणला इजा झाली असणार. त्याला मदत करायला गेलेच पाहिजे. अशा भावनेने हळव्यामनाचे शिष्य खाली जाण्यासाठी धांवत सुटले. दरवाजाजवळ पोहोचतात तों त्यांना कल्याण गड चढून छाटी घेऊन येताना दिसला. कल्याण समर्थांच्या जवळ आला. त्याने छाटी समर्थांना दिली. इतर शिष्य आश्चर्यचकित होऊन पहात राहिले. त्यांनी समर्थांचा जयजयकार केला.

समर्थ देहाने जरी सज्जनगडावर दिसत असले तरी अतीन्द्रियत्वाने व्यापक होते. विशेषत: आपल्या शिष्यपरिवारावर त्यांचे फार लक्ष असे. छत्रपतींवर तर ते असायचेच. एकदा हुकेरी प्रांतात स्वराज्याचा किल्ला “सामानगडचे” बांधकाम चालले होते ते नजरे खालून घालण्यास छत्रपतींची स्वारी तिथे आली. छत्रपतींचा व्याप प्रचंड वाढलेला होता. त्या किल्ल्यासमोर एक मारुती मंदिर होते. ते पाहून छत्रपतींनी गडापासून ते मंदिरापर्यंत रस्ता करण्याची आज्ञा दिली. काम झपाट्याने सुरु झाले. शिवाजीमहाराज उष:कालीच देखरेख करावयास आले. हजारो मजूर काम करीत होते. ते पाहून शिवाजीमहाराजांच्या मनात विचार आला. इतके हजारो लोक आपल्या शब्दाखातर राबतात. ते काही उगाच नाही, कारण आपणच त्यांना पोसतो. “माझ्याशिवाय ह्यांचा

दुसरा पोशिंदा आहेच कोण?” आपल्या सत्शिष्याला झालेला हा “मी” पणाच्या अहंकारचा विटाळ समर्थांना कसा सहन होणार? समर्थ क्षणातच परळीहून निघाले. मनोवेगाने हुकेरीस जिथे रस्त्याचे काम चालले होते तिथे आले. शिवाजीमहाराजांना आश्चर्य वाटले. महाराजांनी उठून अभिवादन केले. चौकशी केली. इतक्या पहाटे कोठून येणे झाले? समर्थ म्हणाले सहजच आलो. इथे काम चालू असल्याचे कळले. म्हटले भेटून जावे.

इतक्यात रस्त्याच्याकामात एक मोठी शीळा फोडण्याचे काम चालेले समर्थांना दिसले. समर्थ शिवबांना म्हणाले, “ शिवबा! ही शिळा मी सांगतो तशी आजच फोडून घे.” शिवाजीमहाराजांनी तात्काळ तशी व्यवस्था केली. शिळा फोडणारा कसबी तबलदार कामाला लागला. ती शिळा निम्मी फोडून होईपर्यंत सूर्य कासराभर वर आला होता. समर्थ त्या कसबी तबलदाराला म्हणाले, “आतां ह्या दगडाचे बरोबर मध्यभागी दोन शकले होतील अशा पद्धतीने फोड.” शिवाजीमहाराज हे सर्व पहात होते. त्यांना कसलाच अंदाज येईना. इतक्यात तबलदाराने तो दगड मधोमध फोडला. तों काय? त्या दगडाच्या मध्यभागी एक मोठा खळगा होता. त्या खळग्यात पाणी होते. त्यात एक बेडूक मजेत बसलेले होते. सर्वांनाच आश्चर्य वाटले. ते पाहून शिवाजीमहाराज सहज उद्गारले, “ भगवंता तुझी लीला अगाध आहे. विश्वाच्या भरणपोषणाची तुझी व्यवस्था अनाकलनीय आहे.”

ते ऐकून समर्थ हसले.म्हणाले, “ नाही शिवबा! सर्वांचे पोशिंदे आपणच आहात. आपले कसब अतुलनीय आहे.” समर्थांचे बोलणे शिवाजीमहाराजांना चांगलेच समजले. ते खूप संकोचले. मनोमन

काळवंडले. समर्थांच्या चरणी लागले. म्हणाले, “प्रभो! अपराध क्षमा केला पाहिजे.” समर्थ सहज म्हणाले, “ शिवबा! मीपण शास्त्रे तुटेना | मीपण फोडीत फुटेना | मीपण सोडिता सुटेना | काही केल्या ||*|| मीपण कोणासच न साहे | ते भगवंती कैसेनि साहे | म्हणोनी मीपण सांडूनी राहे | तोची समाधानी ||*||” समर्थवाणी ऐकून शिवाजीमहाराज तटस्थ झाले. त्यांचे अष्टसात्विक भाव जागे झाले. त्यांनी समर्थांना वंदन केले. समर्थ म्हणाले, “ शिवबा! राज्य श्रींचे आहे. ही भावना अंत:करणात जागी राहू द्या. अहंकाराचे काविरे बाधू देऊ नका. सर्व विकल्प दूर ठेवा. आपण केवळ निमित्तमात्र आहोत, याची सदैव जाणीव राहू द्या. येतो आतां! ” राजे म्हणाले, “ प्रभो! माध्यान्ह झाली आहे. नैवेद्य तयार असणार. कृपया प्रसाद देऊन निघावे! ” समर्थ “तथास्तु” म्हणाले. सर्वांना प्रसाद देऊन आले तसे निघून गले.

समर्थांना अनेकजण शरण येत त्यात अधिकारी अनधिकारी असे सर्वजण असत. असाच औरंगाबादचा एक गृहस्थ शरण आला होता. समर्थांचा अनुग्रह घेऊन साधनेत मग्न होता. त्याची भक्ती वाढतच होती. समर्थांना विडा आवडत असे. म्हणून तो समर्थांना विडा बनवून देत असे. त्याची ती तत्परता समर्थांना आवडत असे. समर्थांना त्यावेळी केंव्हाही विडा हवा असायचा. हा शिष्य केंव्हाही तयारच असायचा. एकदा समर्थांनी रात्री विडा मागितला. त्याने दिला. समर्थांची पिकदाणी त्यावेळी भरलेली होती. ती समर्थांनी त्याच्या जवळ दिली. म्हणाले, “जा! कोणी पाहत नसेल तिथे मोकळी करून लवकर आण. मला पान खाल्यावर थुंकायला लागेल.” हा शिष्य खोलीतून बाहेर पडला. समर्थांचा शिष्यपरीवार इतका मोठा होता कीं बाहेर कुणी ना कुणी तरी भेटतच होते.

समर्थांना पिकदाणी तर लवकर हवी होती. ह्या शिष्याला धीर निघेना. तो गुपचूप एका कोपऱ्यात गेला. कोणी पहात नाही असे पाहून ती पिकदाणी आपल्या तोंडात रिकामी केली, आणि तत्परतेने समर्थांना आणून दिली. समर्थ कौतुकाने म्हणाले, “अरे इतक्या लवकर कुठे ओतून आलास?” त्याने आपल्या मुखाकडे बोट दाखवले. समर्थ म्हणाले, “अरे असे करू नये! पुन्हा असे करू नको.” असे म्हणून त्यादिवसापासून समर्थ त्याला भोळाराम म्हणून हांक मारू लागले.

भोळारामचा द्वेष करणारे काही होतेच. त्यांना वाटे समर्थ फक्त याच्याकडूनच विडा घेतात. केंव्हातरी या भोळारामची फजिती केली पाहिजे. असा अकारण द्वेष त्यांच्या मनात आला. समर्थांनी एकदां दांत दुखतात म्हणून विडा कुटून मागितला. भोळारामने एका पितळी खलबत्त्यात विडा कुटून दिला. खलबत्ता पुन्हा लागेल म्हणून निट जवळच्या कोनाड्यात ठेवला. कुटाळांना तेच फावले. भोळारामची फजिती करायची. असे ठरवून त्यांनी तो खलबत्ता पळवला. समर्थांनी भोळारामला विडा मागितला. कुटूनच आण म्हणाले. भोळाराम त्वरित गेला. विडा चटकन केला पण खलबत्ता सांपडेना! त्याने विचार केला समर्थांना तलफ आहे. उशीर झाला तर सेवेत पडते. समर्थांची सोय बिघडते. त्याने पटकन तोंड धुतले. विडा चांगला बारीक चावला. एका स्वच्छ पानावर काढला. समर्थांच्यापुढे नेऊन ठेवला. समर्थांनी तो पटकन तोंडात टाकला. थोड्यावेळाने म्हणाले, “ भोळाराम! विडा फारच सुंदर जमला. ह्याच खलबत्त्यात रोज कुटून देत जा! ” कुटाळांचे लक्ष होतेच. पण झाले ते विचित्रच झाले. त्यांना प्रश्न पडला. ह्या भोळारामने विडा कुटला कशात?

मग त्यांनी पाळत ठेवली. त्यांना समजले. भोळाराम तोंडातून विडा चावून समर्थांना देतो. शिवाजीमहाराजांचे येणे दर आठवड्यास होत असे. कुटाळांनी ती संधी साधून शिवाजीमहाराजांच्या कानावर ही अघटीत गोष्ट घातली. शिवाजीमहाराजांनी खात्री करून घ्यायची ठरवली. भोजनप्रसाद झाला. शिवाजीमहाराज व समर्थ आंचवून बैठकीच्या खोलीत आले. समर्थांनी नित्याप्रमाणे भोळारामला हांक मारली. म्हणाले, विडा कुटून आण. भोळाराम गेला. भोळाराम जातांच महाराज म्हणाले, " प्रभो क्षमा असावी पण हा भोळाराम विडा कशात कुटून देतो याची...." महाराजांचे बोलणे अर्धवट थांबवून समर्थ म्हणाले, " हो शिवबा! आपणच जाऊन त्याला निरोप द्या, म्हणावे खलबत्त्यासह विडा माझ्या स्वाधीन कर! मग तुम्ही स्वत:च खलबत्त्यासह तो विडा आम्हाला द्या म्हणजे झाले! " राजे झटकन उठले. भोळारामकडे आले. भोळाराम विडा चावत होता. महाराज ते पाहून थक्क झाले. थोडे अस्वस्थ झाले, पण शांतपणे म्हणाले, "भोळाराम, समर्थांनी खलबत्त्यासह विडा माझ्या स्वाधीन करायला सांगितला आहे." भोळारामने क्षणभर विचार केला. समोरच्या खुंटीला टांगलेली तलवार खसकन उपसली. डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच स्वत:च्या मानेवरून फिरवली. उजव्या हाताने शीर महाराजांच्या समोर धरले. कंठनालातून आवाज आला. "राजे! लवकर खलबत्त्यासह विडा घेऊन जा! " थरथरत्या हातांनी महाराजांनी भोळारामचे मस्तक समर्थांकडे आणले. समर्थ हसून म्हणाले, " आणा तो खलबत्ता! आम्हाला हा विडा फार आवडतो." भोळारामच्या मुखातला विडा काढून घेऊन समर्थ म्हणाले, " घाबरू नका राजे! ठेवा हा खलबत्ता जागचे जागी." राजे भोळारामच्या धडाजवळ परत आले. भोळारामचे मस्तक परत त्याच्या

धडावर ठेवले. चमत्कार असा कीं भोळाराम शांतपणे उभा राहिला. त्याने शिवाजी महाराजांना वंदन केले. शिवाजी महाराज परत समर्थांकडे आले. समर्थांनी हसत हसत विचारले, “ काय शिवबा! या खलबत्त्यातला विडा आम्ही खावा कीं नाही?” तेंव्हा राजे म्हणाले, “क्षमा असावी! पण हे विकल्प स्वस्थता लाभू देत नाहीत. मग हे असे घडते.” समर्थ म्हणाले, “ लटक्याची भीड धरणे | भ्रमे भलतेची करणे | ऐसी नव्हेत कीं लक्षणे | विवेकाची ||*|| खोटे अवघेची सांडावे | खरे प्रत्यये ओळखावे | माया त्यागे समजावे | परब्रह्म ||*|| शिवबा! आपण राजे आहात. प्रत्यय घेण्यासाठी आला आहात. खरे काय आणि खोटे काय कसे समजणार? सामान्य लोक चूलबोळक्याचा संसार थाटतात. आपण राज्याचा भार घेतला आहे. त्यामुळे स्वराज्याचा स्फुल्लिंग आपण जोपासला पाहिजे. त्यासाठी “ परी ते शहाणे ओळखावे | गुणवंताचे गुण घ्यावे | अवगुण देखोन सांडावे | जनामध्ये ||*|| मनुष्य पारखून राहेना | आणि कोणाचे मन तोडीना | मनुष्यमात्र अनुमाना | जाणून पाहे ||*|| दिसे सकळांसी सारखा | पाहाता विवेकी नेटका | कामी निकामी लोका | बरे जाणे ||*|| जाणोन पाहिजेत सर्व | हेचि त्याचे अपूर्व | त्याचे त्यापरी गौरव | राखो जाणे ||*|| शिवबा तन्मय झालास! म्हणून तर आम्ही आपणास “शिवकल्याण राजा, श्रीमंत योगी, जाणता राजा” असे संबोधतो. राजे ह्या स्वराज्याचा प्रपंच कितीतरी मोठा आहे. त्यात खरे खोटे राज्यस्थापनेच्या हितासाठी पारखून घेता याचा आनंदच आहे. शुभंभवतु ||” शिवाजीमहाराजांचे समाधान झाले. ते अंतर्मुख होऊन निघाले. त्यांना ध्यानीमनी समर्थच स्मरत असत.

समर्थ महाराष्ट्रात सर्वत्र संचार करीत असत. शिवथरघळीत बरेच दिवस वास्तव्यास होते. तिथेच त्यांनी गुरु-शिष्य संवाद असलेला

दासबोध सांगितला. कल्याणस्वामींनी तो लिहून घेतला. अनेक प्रकारची ग्रंथ रचना केली. घराघरातून व मना-मनातून मनाचे श्लोक सकाळ संध्याकाळ म्हटले जाऊ लागले. उभा महाराष्ट्र समर्थांच्या प्रेरणेने जागा झाला. चैतन्यमय झाला. गावोगाव हनुमान मंदिराची स्थापना होऊ लागली. स्वराज्याच्या आत्मियतेमुळे लोकांना शिवाजीमहाराजांविषयी प्रेमादर उत्पन्न झला. शिवाजीमहाराजांची कीर्ति सर्व भारतभर पसरली. महाराजांच्या गरुडभरारीला आकाशही ठेंगणे झाले. औरंगजेबासारख्या कर्दनकाळाच्या तावडीतूनही त्यांनी भरारी घेऊन पुनश्च सह्याद्रीच्या पर्वतावर आपल्या पंखांची छाया निर्माण केली होती. त्यावेळी समर्थांनी घोषण केली होती.

बुडाला औरंग्यापापी | म्लेंच्छ संहार जाहला |
मांडली मोडली क्षेत्रे | आनंदवन भुवनी ||

अशा ह्या महाराष्ट्रभूमीच्या आनंदवन भुवनात घराघरातून "जयजय रघुवीरसमर्थचा" घोष निनादू लागला होता. तर रणारणातून "हर हर महादेवचा" नारा उमटू लागला होता. स्वातंत्र्याच्या नौबती झडू लागल्या होत्या. सर्व महाराष्ट्र आंतर्बाह्य बदलत होता. मराठी राजाला व मराठी मनाला समर्थांनी प्रेरणा दिली " मराठा तितुका मेळवावा | महाराष्ट्रधर्म वाढवावा ||" समर्थांनी त्यासाठी खास युक्ती केली. शिवाजीमहाराजांच्या अमलाखाली नसलेल्या प्रांतातील जमिनीच्या सनदा मठस्थापनेसाठी मागितल्या. राजांनी त्या नि:शंक मनाने दिल्या व तो तो प्रांत काबीज करून शिवाजी महाराजांनी आपली सत्ता प्रस्थापित केल्यावर समर्थांनी तिथे मठस्थापना केली. शिवरायांचा अंमल वाढत गेला. आतां मराठीमाणसांसाठी अभिषिक्त राजा हवा होता. राजांच्या

सल्लागारांनी मसलत केली. काशिचे विद्वान शास्त्री गागाभट्ट यांना पाचारण करण्यात आले. गागाभट्ट शिवाजीमहाराजांसह परळीला आले. समर्थांचे आशीर्वाद घेतले.

आनंदनाम संवत्सरात ज्येष्ठ शुध्द त्रयोदशीला शके१५९६ या दिवशी संपूर्ण महाराष्ट्र सनाथ झाला. महाराष्ट्राला अभिषिक्त राजा मिळाला. समर्थांचे शब्द खरे झाले “शिवकल्याण राजा”! समर्थांचे ते स्वप्न साकार झाले. त्यांच्याच मुखातून तसे शब्द बाहेर पडले.

“स्वप्नी जे देखिले रात्री | ते ते तैसेचि होतसे ||
हिंडता हिंडता गेलो | आनंदवन भुवनी ||
अनेक वाजती वाद्ये | ध्वनीकल्लोळ उठला ||
छबीने डोलती ढाला | आनंदवन भुवनी ||
येथुनी वाढला धर्मु | रमाधर्म समागमे ||
संतोष मांडीला मोठा | आनंदवन भुवनी ||

असे आपले स्वप्न साकार झाल्याचा समर्थांना मोठा आनंद झाला.

व्यंकोजीराजे भोसले यांच्या आग्रहावरून मागे समर्थ एकदा तंजावरास गेले होते, तिथे त्यांनी एका मूर्तीकारास श्रीराम-लक्ष्मण-सीता व मारुती यांच्या मूर्ती करण्यास सांगितले होते. पण दैववशात त्या मुर्तीकाराचे नेत्र दृष्टिहीन झाले होते. समर्थांनी त्याच्या नेत्रांना पुनश्च दृष्टी प्राप्त करून दिली होती. समर्थ त्या मूर्तींची वाट पहात होते. त्यांना त्या सज्जनगडावर स्थापन करावयाच्या होत्या.

शके १६०२ चैत्र शुध्द १५ला शिवाजी महाराजांनी देह ठेवला. समर्थ अत्यंत बेचैन झाले. स्वत:च्या निरवानिरवीची भाषा करू लागले. त्यावर्षी ते चाफळच्या उत्सवासही गेले नाहीत. त्याचे अक्का,

कल्याणस्वामी, उद्धव गोसावी इत्यादींना मनस्वी वाईट वाटले. इलाज नव्हता. पण शके १६०३ मधल्या रामनवमी उत्सवास समर्थ आवर्जून चाफळला आले. सर्वांना मोठा आनंद झाला. उत्सव मोठ्या आनंदात पार पडला. हनुमान जयंती झाली, आणि समर्थांनी एक दिवस मंदिरात जाऊन श्रीरामांचे दर्शन  घेतले. त्यावेळी त्यांनी सर्वांनाच गाभाऱ्यातून बाहेर जाण्यास सांगितले. आपण एकटेच आंत बसले. चार घटका गेल्या. मंदिर प्रकाशमय झालेले सर्वांनी पाहिले. सभामंडपातील सर्वचजण त्या प्रकाशमय वातावरणाने भारावून गेले. सभामंडपातील सर्वजण एका अनामिक विरहाच्या जाणीवेने अस्वस्थ झाले होते, कारण कुणाला समजत नव्हते. समर्थ चार घटका नंतर बाहेर आले. त्यांनी सभामंडपात येऊन प्रभुरामचंद्रांना साष्टांग नमस्कार केला. श्रीहनुमंताची परवानगी घेऊन सज्जनगडावर परतले.

समर्थ आतां सदैव एकांत सेवन करीत असत. त्यांच्या सर्व हालचाली अत्यंत मर्यादित झाल्या. फारसे बाहेर पडेनासे झाले. श्रीरामनामाचा गजर जागोजागी चालू ठेवला. त्यांच्या अवतीभवती सदैव श्रीरामनामाची धून चालू असे. समर्थांच्या शरीरावर एक दिव्य तेज फाकत होते. माघ शुध्द पंचमीस तंजावर येथून त्या श्रीराम-लक्ष्मण-सीता व हनुमान यांच्या मूर्ती सज्जनगडावर आल्या. व्यंकोजीराजांनी त्या मोठ्या बंदोबस्तात व खास व्यवस्थेत पाठवल्या होत्या. त्यांचे वजन तेरा मण होते. मल्हारराव निंबदेव व केशव गोसावी यांच्या देखरेखीखाली त्या मूर्ती आल्या होत्या. समर्थ ज्या खोलीत निजत होते तिथेच त्या मूर्ती आणवल्या गेल्या. सिंहासन मांडण्यात आले होते. त्यावर मूर्ती विराजमान झाल्या. त्या मूर्तींच्या दर्शनाने समर्थांना मोठेच समाधान झाले. त्यांचे

ध्यान आतां सदैव त्या मूर्तींवरच होऊ लागले. समर्थ त्यांच्याशी बोलत असत. एक दिवस सर्व शिष्यमंडळी समर्थांच्या जवळ बसली होती. त्यावेळी समर्थ एक श्लोक म्हणाले,

“राविकुल तिलकाचा वेळ संनिध आला |
तदुपरी भजनाने पाहिजे सांग केला ||”

हा श्लोक म्हणून झाला ना झाला तोंच उद्धव गोसावींच्या नेत्रातून अश्रुधारा सुरु झाल्या. आपल्या अश्रुपूर्ण भिजलेल्या आवाजात ते त्या श्लोकाच्या पुढचा भाग म्हणाले,

अनुदिनी नवमी हे मानसी आठवावी |
बहुत लगबगीने कार्यसिद्धी करावी ||”

उद्धवांचा कंठ दाटून आला होता. त्याच्या अंत:कारणाचा ठाव उडाला. ज्या उद्धवाला समर्थांच्या मांडीवर खेळण्याची संवय होती, ज्याचा व्रतबंध समर्थांच्या मांडीवर झाला होता, ज्या उद्धवास समर्थांनी टाकळीस बारा वर्षे वाट पहावयाला लावली होती, त्या उद्धवांनी समर्थांच्या चरणावर मस्तक टेकून अश्रुपात करण्यास सुरुवात केली. समर्थांना काय म्हणायचे आहे, ते उद्धवाला आधीच समजले, म्हणून त्याने तो श्लोक पूर्ण केला! समर्थांनी सर्वांसमक्ष उद्धवाला आपल्या हृदयाशी कवटाळले. म्हणाले, शाब्बास! उद्धवा शाब्बास! मग कर आतां उत्सवाला सुरुवात.” समर्थांची आज्ञा शिरसावंद्य मानून उद्धवाने अहोरात्र भजनाचा धिंग चालू ठेवण्याची व्यवस्था केली. तो माघ वद्य षष्ठीचा तो दिवस होता. उद्धवांनी समर्थांच्या निर्याणाची नवमीच्या संकल्पाची कल्पना इतर सर्वांना सांगितली. मग मात्र ही वार्ता वाऱ्यासारखी सर्वत्र पसरली. सर्व देशभर भिरभिरू लागली. वायूदेवाचा सूत प्रत्यक्ष सगुणात आला होता. तो

आतां निर्गुणात जाणार होता. याचे त्या प्रभंजनास काहीच वाटले नसेल काय? त्याने समर्थांच्या निर्याणाचा प्रवाह गावोगावी पोहोचवला.काश्मीर ते कन्याकुमारी सर्वत्र ही बातमी गेली. साऱ्या भक्तांचे लक्ष सज्जनगडाकडे लागले. माघवद्य नवमीची वाट पाहू लागले.

माघ वद्य नवमीसाठी भक्तांची रीघ सज्जनगडाकडे लागली. अगणित भक्त आले. परळी श्रीरामनामाने दणाणून गेली. त्या रामनामाच्या घोषात एक गंभीर लय होती. आवाजात भाव होता. स्वरात कंप होता. मनात भक्ती होती. चित्तात आर्तता होती. टाळ, मृदुंग, विणा इत्यादी वाद्ये जणू हळू हळू मुसमुसत होती. अक्का आणि उद्धव यांची स्थिती काय होती? ते सदैव समर्थांच्या खोलीतच होते. समर्थांनी इतरांना आत येण्यास मज्जाव केला होता. फक्त दर्शनापुरते येऊन जाण्यास मिळत होते. रीघ थांबत नव्हती.

माघ वद्य नवमी उजाडली. समर्थांनी सकाळीच उठून प्रभूश्रीरामांची पूजा केली. समर्थ म्हणाले, “प्रभो! आपल्या आज्ञेप्रमाणे वर्तलो! आतां आपले म्हणा. मला आपल्यात घ्या! ” त्यांची ही प्रार्थना तिथे असलेल्या अक्का व उद्धव यांनी ऐकली. त्यांनी टाहोच फोडला. खोलीबाहेर भक्तांची अलोट गर्दी होती, पण त्या गर्दीला एक विलक्षण शिस्त होती. कोणी खोलीत जाण्याचा प्रयत्नही केला नाही. अक्का व उद्धव यांचा आवाज ऐकून सर्वांनी कान टवकारले. भजनाची टाळ कचकन थांबली. वीणा स्तब्ध झाली. निरव शांतता गडाचे काळीज चिरत चिरत खालपर्यंत गेली. वर पासून खालपर्यंत वातावरण निशब्द झाले. इतक्यात समर्थांचा आवाज आला. “उद्धवा! अरे माझ्या सहवासात राहून तुम्ही हेच शिकलात काय रे?” उद्धव विनयाने म्हणाला, “प्रभो! आपल्यापासून जे

शिकलो त्यामुळे कुठे गुंतलो नाही हे जरी खरे असले तरी सद्गुरूंच्या सगुण दर्शनाची आस कधीतरी पूर्ण होणारी आहे कां? त्याने शोक अनावर होतोय! ” समर्थ व उद्धव यांचा हा संवाद होत होता. अक्का पण उद्धवांना साथ देत होत्या. दुपार होत आली. आणि समर्थांच्या मुखातून तेज बाहेर पडून ते श्रीरामांच्याकडे प्रवाही झाले. ते पाहून उद्धवांनी मोठाच आकांत मांडला. समर्थ एक क्षण स्तब्ध झाले. त्यांनी उद्धवाला पोटाशी धरले. आणि आपल्या मधुर पण खणखणीत आवाजात म्हणाले,

माझी काया गेली हे तो खरे | परी मी आहे जगदाकारे ||
ऐका स्वहित उत्तरे | सांगेन ती ||१||
नका करू खटपट | पहा माझा ग्रंथ नीट ||
तेणे सायुज्याची वाट | ठायी पडे ||२||
रहा देहाच्या विसरे | वर्तुनका वाईट बरे ||
तेणे मुक्तीचीही द्वारे | चोजविती ||३||
रामी रामदास म्हणे | सदा स्वरूपी अनुसंधान ||
करा श्रीरामाचे ध्यान | निरंतर ||४||

समर्थांच्या वाणीने सारे भारावले. उद्धवांनी पाहिले तेज तेजात विलीन झाले आहे. अक्का, उद्धव गोसावी क्षणकाल तटस्थ झाले. त्यांनी समर्थांना साष्टांग नमस्कार घातला. आतां समर्थ त्यांना मुखाने म्हणणार नव्हते

## “जयजय रघुवीर समर्थ”